


नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)





महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

महाराष्ट्र राज्याचे सांस्कृतिक धोरण २०१० अंतर्गत मराठी भाषेतील प्रतिमुद्राधिकाराची (कॉपीराइटची) मुदत संपलेले दुर्मिळ ग्रंथ महाजालावर उपलब्ध करून द्यावे असे म्हटले आहे. त्यानुसार मराठी भाषा विभागाच्या आदेशाप्रमाणे (शासननिर्णय क्र. रासांधो १०१२/ प्र. क./२०१२/भाषा-३ दि. २८ मार्च २०१३) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे असे ग्रंथ आणि नियतकालिके महाजालावर उपलब्ध करून देण्याचा प्रकल्प राबवण्यात येत आहे. त्याच बरोबर प्रतिमुद्राधिकाराच्या कक्षेत येणारी काही साधनेही प्रतिमुद्राधिकारधारकांची उचित अनुमती प्राप्त झाल्यास संस्थेद्वारे संगणकीकृत करून अभ्यासकांसाठी उपलब्ध करून देण्यात येत असतात.

सदर प्रकल्पांतर्गत महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे ह्या संस्थेद्वारे प्रकाशित करण्यात येणाऱ्या महाराष्ट्र साहित्य पत्रिका ह्या नियतकालिकाच्या अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासंदर्भात उपरोक्त संस्थेला आवाहनपर विनंती करण्यात आली होती.

सदर विनंती मान्य करून महाराष्ट्र साहित्य परिषदेद्धारे सदर अंक संगणकीकरणासाठी उपलब्ध करून देण्यात आले. हे अंक सदर संस्थेच्या सहकार्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर/ संस्थांवर असणार नाही.

सदर अंक केवळ अभ्यासकांच्या सोयीसाठी संगणकीय स्वरूपात उपलब्ध करण्यात येत असून अंकांतील सामग्रीचे (लेखन, मांडणी, छायाचित्रे, रेखाचित्रे इ.) प्रतिमुद्राधिकार त्या त्या लेखकांकडे अथवा प्रकाशकांनी त्या त्या वेळी केलेल्या व्यवस्थेनुसार आहेत ह्याची नोंद घेण्यात यावी. त्या सामग्रीसंदर्भातील कोणतेही अधिकार वा दायित्वे राज्य मराठी विकास संस्था, मराठी भाषा विभाग किंवा महाराष्ट्र शासन ह्यांच्याकडे असणार नाहीत.

अनुक्रमणिका






महाराष्ट्र-साहित्य-परिषदेचें त्रैमासिक



वर्ष २१ वें : अंक ३ रा

आक्टोबर-डिसेंबर १९४८



संपादक

# महाराष्ट्र-साहित्य-पत्रिका

वर्ष २१ वें ] ऑक्टोबर-डिसेंबर १९४८ [ अंक ३ रा

## वाटुली :

वा. भ. बोरकर

वाटुलि मी वनवेडी
मज हिंडायाची गोडी
गिरिदरि ओलांडित मी फिरत्यें
नदिच्या संगें नाचत रमत्यें
कुंज-निकुंजांना उरि धरित्यें
भांग भुईचा मोडी
वाटुलि मी वनवेडी
दक्षिण उत्तर मी वागडत्यें
विजेपरी चौंहिकडे उडत्यें
पांथा डोळा मोडुनि दडत्यें
धालुनि लार्डी कोडीं
वाटुलि मी वनवेडी
जिभली क्षितिजाला दाखवित्यें
जळांत नागिणशी मावळत्यें
पैलथडीला पुन्हा उगवत्यें
मत्स्यपुरींतिल होडी
वाटुलि मी वनवेडी
भोळि कधीं गिरिकुहरीं भ्रमत्यें
कधिं खड्गापरि वनीं चमचमत्यें
अभ्यागतपद चुंबुनि करित्यें
जीवन परि कुरवंडी
वाटुलि मी वनवेडी

---

गुर्जरकवि उमाशंकर जोशी यांच्या सुप्रसिद्ध 'वाटाडी' या कवितेचा अनुवाद.

अनुक्रमणिका



# कालिदासाची वनश्री :

ले०— डॉ. म. वि. आपटे,
बी. एस्‌सी.; एम्. बी. बी. एस.
कैवल्यधाम, लोणावळें.

कालिदासाने ऋतुसंहार–काव्यांत कोणती वनश्री वर्णिली आहे तें मागील लेखांत पाहिलें.* आता मेघदूतकाव्यांत कोणती वनश्री सांगितली आहे पाहूं या. या काव्याच्या पूर्वार्धांत रामागिरीपासून उज्जयिनीमार्गें कैलासावरील अलकानगरीपर्यंत मेघाचा संभाव्य प्रवास वर्णिला असून, उत्तरार्धांत मेघाकरवीं यक्षानें आपल्या विरहिणी स्त्रीस सांगावयाचा निरोप वर्णिला आहे. प्रवास अवघ्या दोन दिवसांचा आहे. हे दिवसहि आषाढाचा पहिला आणि दुसरा असे निश्चित आहेत. या प्रवासाचा पहिला भाग विन्ध्य प्रदेशच आहे. साहजिकपणें ऋतुसंहारांत उल्लेखिलेलींच झाडें झुडें येथें पुनः आढळतात. निचुल आणि जम्बू हीं दोन झाडें मात्र अधिक आहेत. यापैकीं निचुल हा एक वेताचा प्रकार आहे. जम्बू म्हणजे जांभूळ हें स्पष्टच आहे. प्रवासाचा दुसरा भाग विंध्यापासून हिमालयापर्यंत. यांत वानीर आणि उदुंबर यांचा मात्र उल्लेख अधिक आहे. यापैकीं वानीर हाहि एक वेताचाच प्रकार आहे. उदुंबर हा उंबर होय. हिमालय प्रदेश हा प्रवासाचा तिसरा भाग. यांत विशेष वनवृक्ष म्हणजे सरल आणि देवदार हे होत. याखेरीज मंदार नामक कल्पवृक्ष आढळतात. हिमालयाच्या वर्णनांत कीचकवनांचा उल्लेख येतो. हे कीचक म्हणजे दांडगे वांबू होत. उज्जयिनीच्या वर्णनांत, तेथे पूर्वी तालवृक्षांचें वन होतें असें म्हटलें आहे. उपमानवस्तु म्हणून जपा म्हणजे जास्वंदी आणि स्थलकमलिनी यांचीं नांवें आलीं आहेत. याशिवाय स्त्रियांचे अलंकार सर्व पुष्परूपच सांगितले आहेत. त्यांत शिरीषाचा उल्लेख आहे. आता या सर्व उद्‌भिदांचा विस्तारशः विचार करूं.

## जम्बू, जांभूळ; उदुंबर, उंबर.

जांभळीचे वृक्ष भारतांत सर्वत्र होतात. डोंगराळ भूमींत त्यांचीं फळें लहानशीं व अल्परस अशीं असतात, पण खोल मातींत तीं मोठालीं आणि रसभूयिष्ठ असतात. फळें पिकण्याचा ऋतु वर्षाकालाचा आरंभ हा आहे. या वृक्षांचीं मोठमोठालीं वनें आहेत.

त्वय्यासन्ने परिणतफलश्यामजम्बूवनान्ताः । पूर्वमेघ २३

तूं जवळ आल्याने दशार्ण देशाच्या वनांतील जांभळीचीं फळें पिकून निळींकाळीं दिसतील.

उंबराचे वृक्षहि भारतांत सर्वत्र आढळतात. हे वन्यच आहेत. यापासून लागवडीने अंजीर निर्माण झाला आहे म्हणतात. याचाहि पिकण्याचा ऋतु वर्षाकालच आहे.

शीतो वायुः परिणमयिता काननोदुंबराणाम् । पूर्वमेघ ४४.

रानांतील उंबरें पिकविणारा थंड वायु... [ जम्बू १ उदुम्बर २ ].

* मागील लेखासंबंधीं कांहीं वाचकांनी समक्ष व कांहींनी पत्रद्वारें पसंती व्यक्त करून कांही पृच्छा आणि मतभेदहि प्रकट केले आहेत. त्या सर्वांचा परामर्श लेखमालेच्या शेवटीं घेण्यांत येईल. सर्वांचा आभारी आहे.

## तालवन.

उज्जयिनीचें वर्णन करतांना कवि म्हणतो वृद्धलोक कौतुकाने सांगतात की, या ठिकाणीं प्रद्योत राजाचें ताडांचें सोनेरी वन होतें.

हैमं तालद्रुमवनमभूदत्र तस्यैव राज्ञः। पूर्वमेघ ३३.

ज्याच्या पानाचे पंखे होतात, ज्याच्या रसाची ताडी होते, आणि ज्याचीं फळें ताडगोळे म्हणून खातात, तो वृक्ष ताल होय. या झाडाच्या पानाचा आद्य भाग म्हणजे त्याचें डेख कोपरापासून मनगटापर्यंतच्या हातासारखें, आणि पुढला पसरट भाग, तळहात व बोटें यासारखा असतो. म्हणून या झाडाला इंग्रजींत पाम (पंजा) असें नांव पडलें आहे. या झाडाचीं पानें वाऱ्याने हालतात तेव्हा ताल धरल्याप्रमाणें आवाज निघतो म्हणून ताल किंवा ताडन केल्याप्रमाणें देखावा दिसतो म्हणून ताड अशीं नांवें पडलीं असावींत.

ताल याचप्रमाणें ताली असा स्त्रीलिंगी शब्दप्रयोग काव्यांत आढळतो. ताडांत नर-झाडें आणि मादी झाडें अशीं भिन्न झाडें असतात. फळें येतात तीं नारळाच्या फळासारखीं, पण आकाराने लहान असतात. पिकल्यावर तीं पिवळीं दिसतात. यामुळे तालवनाला सोनेरी असें विशेषण दिलें आहे.

प्राप तालीवनश्यामं उपकंठं महोदधेः। रघु० ४. ३४

तालीवनामुळे काळसर झालेल्या समुद्रकांठापर्यंत रघुराजा पोचला. [ताल, ताली ३].

## निचुल, वानीर आणि वेतस.

या तीनहि शब्दांचा अर्थ वेत असा करतात. आधुनिक शास्त्रकार वेताची गणना ताडाच्या गणांत करतात. रामगिरीवर निचुल आणि देवगिरीजवळ गंभीरा नदीच्या कांठी वानीर असल्याचे उल्लेख प्रस्तुत काव्यांत आहेत. वेताचीं कांडें उसासारखीं जाड असतात; तथापि त्याची साल उसाच्या कित्येक पटीने जाड असून आंतला गाभा फार चिवट असतो. लौकिक व्यवहारांत आंतला गाभाच वापरतात. वेताचीं पानें उसाच्या पानासारखीं आरंभीं कांडास गुरफटलेलीं असतात. त्यांचीं टोकें मात्र आकडीवजा असून त्यांच्या साह्यानें ते एकाद्या झाडाला किंवा झुडपाला धरून त्यांच्या शेंड्यापर्यंत उंच चढून जातात. असा आधार न सांपडला तर ते भुईसरपट राहतात. त्यांची लांबी ६०० हात असूं शकते. पूर्वी विहारार्थ किंवा निवासार्थ झोपडी बांधण्यास त्यांचा उपयोग करीत. वेत दलदलीमध्येच वाढूं शकतात. म्हणून ते नदीच्या किंवा एकाद्या जलाशयाच्या कांठावरच आढळतात. तमसा नदीच्या तीरावर मृगया करीत असतां दशरथ राजाने हत्तीवर म्हणून सोडलेला बाण मुनिपुत्र श्रवणाला लागला त्याचें कारण वेतसांचा आडोसा !

हा तातेति क्रंदितमाकर्ण्य विषण्णः तस्यान्विष्यन् वेतसगूढं प्रभवं सः।

रघुवंश ९. ७५

वेतसांच्या आडून 'हा तात' असें ओरडणें ऐकूं आलें; त्याने खेद होऊन इ० ओसाड पडलेल्या अयोध्येची अधिदेवता कुशराजाकडे जाऊन म्हणतेः—

उपान्तवानीरगृहाणि दृष्ट्वा शून्यानि दूये शरयूजलानि। रघु. १६. २१.

शरयू तीरावरील वानीरांचीं गृहें ओस पडलेलीं पाहून मला दुःख होत आहे.

स्थानादस्मात् सरसनिचुलादुत्पतोदङ्मुखः खम्। पूर्वमेघ १४

अनुक्रमणिका

रसाळ निचुल असलेल्या या जागेपासून ( रामगिरीवरून ) उत्तरेकडे तोंड करून आकाशांत उडी मार.

तस्याः किंचित् करधृतमिव प्राप्तवानीरशाखम् ( सलिलवसनम् )
पूर्वमेघ ४३.

वानीरशाखांना जाऊन भिडलेलें त्या नदीचें जलरूपी वस्त्र जणूं हातानें धरून उचलल्याप्रमाणें...... [ निचुल ४ वानीर ५ वेतस ६ ].

## सरल, देवदार आणि कीचक.

सरल व देवदार हीं दोन झाडें हिमालयांतच होणारीं आहेत. यांचीं पानें सुई सारखीं असतात म्हणून त्यांना सूचिपर्ण म्हणतात. सरलाच्या वनांत वणवे लागतात. त्यांतून निभावण्याइतका कणखरपणा त्यांना असतो. ही गोष्ट कवीने प्रस्तुत काव्यांत उल्लेखली आहे. या झाडांची विशेष लक्षणीय गोष्ट म्हटली म्हणजे ही की त्यांना बी येतें तें आरंभापासूनच उघडें असतें. त्यांना वेष्टन कसें तें नसतेंच म्हणून त्यांना नग्नबीज म्हणतात. त्यांच्या कांडांचा अग्रभाग टोंकदार होऊन टोकांच्या लगेच मागे क्रमशः फुगतो. या फुगवट्यावर अनेक बीजें शेजारीं शेजारीं उत्पन्न होतात. या बीजधारक निमुळत्या भागास शंकु आणि झाडास शंकुमन्त म्हणतात. ( कोनिफर ).

सरलापेक्षां देवदारू आकाराने फार मोठे होतात. त्यांची उंची ५०-६० हात आणि घेर १५-२० हात होऊं शकतो. या वृक्षांतून चीक निघतो त्याचाहि उल्लेख कवीने केलेलाच आहे. हिमालय वर्णनांत कवि म्हणतोः—

कपोलकण्डूः करिभिर्विनेतुं विघट्टितानां सरलद्रुमाणाम् ।
यत्र स्रुतक्षीरतया प्रसूतः सानूनि गन्धः सुरभीकरोति ॥ कुमार १.९.

ज्या ठिकाणीं गाल खाजविण्याकरतां हत्ती सरलवृक्षावर ते घासतात आणि त्यामुळे आंतील चीक निघून सर्व शिखरावर त्याचा दरवळ पसरतो असा हिमालय.

तं चेद्वायौ सरति सरलस्कंधसंघट्टजन्मा । ( बाधेत दवाग्निः ) पूर्वमेघ ५५

वायूच्या हालचालीमुळे सरलवृक्षांचीं खोडें एकमेकांस घासून जर वणवा पेटला आणि त्या हिमालयास पीडा होऊं लागली तर......

भित्वा सद्यः किसलयपुटान् देवदारुद्रुमाणां । ये तत्क्षीरस्रुतिसुरभयो दाक्षिणेन प्रवृत्ताः ॥ आलिङ्ग्यन्ते गुणवति मया ते तुषारार्द्रिवाताः...॥उत्तरमेघ ४७

देवदारू वृक्षांच्या कोवळ्या पालवीमधून घुसून त्यांच्या चिकाने सुगंधित झालेले जे हिमालयाचे वारे त्यांनाच, हे गुणवति, मी कवटाळतों ! [ सरल ७ देवदारू ८ ]

हिमालयावरील कीचकांचा उल्लेख असाः—

यः पूरयन् कीचकरन्ध्रभागान् दरीमुखोत्थेन समीरणेन ।
उद्गास्यतामिच्छति किन्नराणां तानप्रदायित्वमिवोपगन्तुम् ॥ कु० १.८

जो दरीमुखांतून वर आलेल्या वायूने कीचकांमधील फटी भरून टाकून गात असलेल्या किन्नरांच्या गाण्याचा ताल धरूं पाहतो तो......

प्रस्तुत काव्यांतहि यक्ष म्हणतोः—

शब्दायन्ते मधुरमनिलैः कीचकाः पूर्यमाणाः । पूर्वमेघ ५७

कीचकामध्ये वारा घुसल्याने मधुर शब्द उमटेल. [ कीचक ९ ]

चिकाचा पडदा या शब्दप्रयोगांतील चीक हा शब्द कीचकावरून निघाला असावा. येथें चीक म्हणजे बांबूच्या चोयट्या असा अर्थ आहे. कीचक म्हणजे बांबूच असल्याने हें व्युत्पादन समर्थनीय आहे. कळक हा शब्दसुद्धां कीचक या शब्दावरून निघाला असावा.

## जपा, जास्वंदी.

जपा हें उद्यानपुष्प म्हणून प्रसिद्ध आहे. एकेरी, दुहेरी, लाल, अरुण, श्वेत असे जास्वंदीचे बहुत प्रकार प्रसिद्ध आहेत. यांमध्ये प्रधान भेदलक्षण म्हणजे फुलांचा रंग आणि पाकळ्यांची संख्या. यांतील एकेरी लाल प्रकार हा मुळचा वन्य असून बाकीचे संस्काराने सिद्ध झालेले उपवन्य होत. एकेरी फुलास पाचच सुट्या पाकळ्यांचा एक घेर असतो. मध्यवर्ती किंजलाभोंवतीं केसर एकमेकास चिकटलेले असतात. किंजलाचें अग्र ( किंजल्क ) पंचधा झालेलें आढळतें. कवीने संध्याकाळच्या मेघाचा वर्ण ताज्या जास्वंदीसारखा लाल असतो असें म्हटलें आहे.

सांध्यं तेजो प्रतिनवजपापुष्परक्तं दधानः । पूर्वमेघ ३८ [ जपा १० ]

## शिरीष.

हस्ते लीलाकमलमलके बालकुंदानुविद्धं नीता लोध्रप्रसवरजसा पांडुतामाननश्रीः ।
चूडापाशे नवकुरवकं चारु कर्णे शिरीषं सीमन्ते च त्वदुपगमजं यत्र नीपं वधूनाम् ॥
उ० मे० २

हातांत कमल, केसांत कुंदकळ्यांची माळ, तोंडावर लोध्राचें परागचूर्ण, वेणींत कुरबक, कानावर शिरीष, डोक्यावर मधोमध नीप, अशी पुष्पांची रचना स्त्रिया करीत असें कवि म्हणतो. यांतील शिरीष एवढेंच येथें नवीन आहे. शिरीष हा मोठा वृक्ष असतो. याची पर्णदलें साधारण पैशाएवढी बारीक असून एकंदर पालवी हिरवीगार आणि दाट असते. हा उन्हाळ्यांत फुलतो. याचीं फुलें सुकुमार म्हणून फार प्रसिद्ध आहेत. या फुलांच्या पाकळ्या अत्यंत लहान असून केसर मात्र विपुल आणि लांब लांब असतात. त्यांचा रंग हिरवस असून एकंदर फूल वजनांत अगदी हलकें असतें. हे सर्व गुण रघुवंशांतील अयोध्येच्या उद्यान–वर्णनांत कवीने उत्तम रीतीने सूचित केले आहेतः—

स्वेदानुविद्धार्द्रनखक्षतांके भूयिष्ठसंदष्टशिखं कपोले ।
च्युतं न कर्णादपि कामिनीनां शिरीषपुष्पं सहसा पपात ॥१६.४८॥

कामिनींच्या कानावरील शिरीष पुष्प निसटलें खरें पण एकदम खालीं पडलें नाही. त्यांच्या गालावरील नखक्षतांत घर्मबिंदू जमले होते, त्यांतच तो केसरांचा झुपका अडखळून राहिला ! पुढे कुशराजाच्या तोंडीं कवीने वचन घातलें आहे तें:—

अमी शिरीषप्रसवावतंसाः प्रभ्रंशिनो वारिविहारिणीनाम् ।
पारिप्लवाः स्रोतसि निम्नगायाः शैवाललोलान्छलयन्ति मीनान् ॥१६,६१॥

या विलासिनी जलक्रीडा करीत आहेत, त्यामुळे मासे मंडळीची मात्र फसवणूक होत आहे. शिरीषपुष्पें स्त्रियांच्या कानावरून गळून नदीच्या पाण्यावर नाचत आहेत, तीं त्यांना विलोभनीय शेवाळींच भासत आहेत ! !

शिरीषासंबंधीं नेमकें हेच विचार शाकुंतल नाटकांत आढळतात.

स्रस्तं कर्णशिरीषरोधि वदने घर्मांभसां जालकम् । अंक १.२५.

कानांवरील शिरीषांना अटकाव करणारे घामाचे बिंदू तोंडावरून खाली ओघळत आहेत.

कृतं न कर्णार्पितबंधनं सखे शिरीषमागंडविलंबि केसरम्।

मित्रा, गालापर्यंत लोंबणारे केसर असणारे शिरीष चित्रांत रेखाटण्याचें राहिलेंच की !

अंक ६.१८ [ शिरीष ११ ].

## स्थलकमल.

चक्षुः खेदात् सलिलगुरुभिः पक्ष्मभिः छादयन्तीम्।
साभ्रेह्नीव स्थलकमलिनीं न प्रबुद्धां न सुप्ताम्॥ उ. मे. ३०॥

'मेघा माझ्या पत्नीचे डोळे, पापण्या अश्रूंनी जड होऊन, धड उघडेहि नाहीत आणि धड मिटलेलेहि नाहीत अशा स्थितींत असल्यामुळे ती अभ्र आल्या दिवशींच्या एखाद्या स्थलकमलिनीसारखी दिसेल !' असें यक्ष सांगत आहे. कमळाप्रमाणें सूर्यप्रकाशानें उमलणारें फूल ज्या भूरुहाला येतें असें एखादें झाड स्थलकमल म्हणून उल्लेखलें आहे, हें उघड आहे.

काश्मीर प्रांतांत एका फुलाला स्थलकमल किंवा भुईकमळ म्हणतात. तें फूल निशिगंधासारखें असतें. आकृति तसाच आकार थोडासा मोठा आणि रंग पिवळा असतो. रंग तांबडा असतो असेंहि कोणी म्हणतात. रंग पिवळा किंवा तांबडा कोणताहि असला तरी मेघदूतांतील वर्णनाशीं तो सुसंगतच आहे. पांढरा मात्र विसंगत आहे. कारण प्रायः पांढरीं फुलें रात्रीं उमलणारीं असून इतर रंगाच्या फुलांनाच उमलण्याकरतां सूर्यप्रकाशाची अपेक्षा असते. प्रस्तुत उदाहरणांत तर प्रकाशाशीं विशेष संबंध वर्णिला आहे. म्हणून कवीला काश्मीरी फुलेंच अभिप्रेत आहेत असें दिसतें.

निशिगंधाच्या गणांतलीं आणखी कांहीं फुलें अशीं आहेत कीं त्यांना स्थलकमल ही संज्ञा चांगली शोभते. तथापि रूढीनें त्यांना तसें नांव पडल्याचें दिसत नाहीं. त्यांपैकीं सर्वांत मोठें फूल पाच सहा अंगुलें रुंदीचें असतें. त्याचें झाडहि दोन पुरुष किंवा अधिक उंच असतें. म्हणून त्यास आधुनिकांनीं भव्य लिली असें नांव दिलें आहे. इंग्लिश भाषेंत लिली हें नांव आद्य असून पाणलिली असें नांव कमळांना रूढ झालेलें आहे. आपल्याकडे कमळांचा परिचय पहिला आणि लिलींचा नंतरचा, म्हणून लिलींना स्थळकमलें असें म्हणूं लागले. भव्य लिली हिमालयांत आढळतात. कोकणांत कळलावी म्हणून एक लता आढळते. तिचा कांदा लिलींच्या सारखाच भुईंत राहतो. पावसाळ्यांत पालवी वगैरे येऊन फुलें येतात. तीं प्रौढ झालीं म्हणजे त्यांना भडक लाल रंग येतो. त्याला स्थलकल्हार, कल्हारी, अशीं संस्कृत नांवें असून मराठींत कलिकारी, कळलावी अशीं नावें रूढ आहेत. आधुनिकांच्या मतें सर्व लिलींत दिखाऊपणांत कल्हारी उत्कृष्ट आहे, म्हणून तिची लागवड उद्यानांत करण्याची चाल पडली आहे. सह्याद्रीच्या पश्चिमेस या लतांचीं वनेंच्या वनें आढळतात. कल्हार म्हणजे तांबडें कमळ असा अर्थ आहे. त्यावरून कल्हारी किंवा स्थलकल्हारी ही स्थलकमलिनीच असें म्हणणें प्राप्त आहे. एकंदरींत कमल हा जसा गणवाचक शब्द आहे तसा स्थलकमल हाहि लिली या गणाचा वाचक शब्द असावा असें दिसतें.

उद्भिदांचे गण ठरविण्याची आज जी पद्धति आहे ती कालिदास काळीं रूढ नव्हती हें उघडच आहे. स्थूल दृष्टीनें सादृश्य ज्यांत आहे त्यांस एक सामान्य वर्गनाम रूढ

होत असे. जसें कमल, तृण, वृक्ष. लिली ही संज्ञा देखील मूळची लौकिकच होती ती आतां शास्त्रीय केलेली आहे. आपल्याकडे नागदमनी किंवा नागदवणी म्हणून जें उद्भिद प्रसिद्ध आहे तें शास्त्रीय व्याख्येप्रमाणें लिली या गणांत येत नाहीं. तथापि तें स्थूलदृष्टया इतकें लिलीसारखें दिसतें की शास्त्रीय दृष्टीखेरीज त्यांतील भेद ओळखता येणार नाही. या करतांच आधुनिकांनी सुद्धां त्याचा गण भिन्न मानला तरी प्रगण एकच मानला आहे. म्हणून स्थल-कमल हा शब्द नुसता लिलीगणाचाच नव्हे तर लिलीप्रगणाचाहि वाचक ठरतो.

[ स्थलकमल १२, कल्हारी १३, नागदमनी १४ ]

## यक्षाचें उद्यान

मेघदूत काव्यांत यक्षाच्या घरांतील उद्यानाचें वर्णन अगदी आटोपशीर असून अति-शय मार्मिक आहे तें असें.

यस्योपान्ते कृतकतनयः कान्तया वर्धितो मे
हस्तप्राप्यस्तबकनमितो बालमन्दारवृक्षः ॥ १५ ॥ ( उत्तरमेघ )
वापी चास्मिन् मकरतशिलाबद्धसोपानमार्गा
हैमैः छन्ना विकचकमलैः स्निग्धवैदूर्यनालैः ।
यस्यास्तोये कृतवसतयो मानसं सन्निकृष्टम्
नाध्यास्यन्ति व्यपगतशुचः त्वामपि प्रेक्ष्य हंसाः ॥ १६ ॥
तस्यास्तीरे रचिताशिखरः पेशलैरिन्द्रनीलैः
क्रीडाशैलः कनककदलीवेष्टनप्रेक्षणीयः । ... ॥ १७ ॥
रक्ताशोकश्चलकिसलयः केसरश्चात्र कान्तः
प्रत्यासन्नौ कुरबकवृतेर्माधवी मंडपस्य । ...
एकः सख्यास्तव सह मया वामपादाभिलाषी
काङ्क्षत्यन्यो वदनमदिरां दोहद-छद्मनास्याः ॥ १८ ॥
तन्मध्ये च स्फटिककफलका कांचनी वासयष्टिः
....................................
यामध्यास्ते दिवसविगमे नीलकण्ठः सुहृद्वः ॥ १९ ॥

" आमच्या घराच्या दाराजवळ आंतल्या अंगास, माझ्या पत्नीने मुलासारखा पाळलेला एक लहानसा मंदारवृक्ष आहे. त्याला फुलांचा भर येऊन तो इतका लवला आहे की सबंध ताटवाच्या ताटवा सहज हातीं यावा. आमच्या घरांत एक वापी आहे. तिच्या आंत उतरण्याकरतां पायऱ्या आहेत. तिच्या पाण्यावर सोनेरी कमळांचें जणूं झांकणच बन-लेलें आहे. कमळाच्या दांड्यांची शोभा वैदूर्यमण्यासारखी आणि पायऱ्यांच्या शिलांची शोभा माणकासारखी आहे. या वापीच्या तीरावर हंसांची वसति आहे. जवळच मानससरोवर आहे आणि तूं तिकडे जाणार हें त्यांस माहीत आहे, तरी सुद्धां तुजबरोबर तिकडे जाण्याचें त्यांच्या ध्यानीं मनीं येणार नाहीं बरें. या वापीच्या तीरावर एक क्रीडाशैल आहे. त्याच्या शिखरावर इन्द्रनीलमणी रचलेले आहेत, आणि सभोवार सोनेरी कर्दळी लावलेल्या आहेत. तेथेच एक अशोक आणि बकुल असे दोन वृक्ष आहेत. अशोकास कोवळे तांबडे लाल हालते-डोलते पल्लव आले आहेत. माझ्यासह तुझ्या सखीच्या डाव्या पायाचा स्पर्श व्हावा अशी अशोकाला हुरहूर लागली आहे, आणि बकुलाला तिच्या तोंडची मदिरा मिळावी असे डोहाळे लागले आहेत ! तेथून जवळच माधवी लतेचा मंडप आहे. त्या भोवती कोरांटीचें

कोंडाळें आहे. त्या दोन वृक्षांच्या मध्ये स्फाटिकाच्या फळ्यांत गुंतवलेली एक सोनेरी दांडी आहे. या दांडीवर आमचा प्रिय मित्र मयूर दिवसाअंतीं वसति करतो." वृक्ष, क्षुप (झुडुप), वापी, शैल, जलपक्षी आणि स्थलपक्षी यांचा हृदयंगम समवाय येथे वर्णिला आहे. उद्यानाचीं हींच प्रमुख अंगें होत, असें आधुनिक उद्यानकार मानतात.

**मंदार**—हा स्वर्ग-तरु म्हणून उल्लेखलेला आहे. तथापि आज तो पृथ्वीवरहि आढळतो. मंदार हा नर आणि रुई त्याची मादी असें कोणी म्हणतात. वस्तुतः मंदार हा रुईचा थोरला भाऊ आहे. रुई हें झुडूप आहे. रुईच्या एकाच फुलांत नर व मादी दोनहि लिंगांचे अवयव असतात. तसेंच मंदाराच्याहि. मंदार हा मोठा छायावृक्ष आहे. मंदाराच्या छायेंत मुली खेळत असत असा प्रस्तुत काव्यांत उल्लेख आहे. मंदाराचीं पानें आणि फुलेंहि रुईच्यासारखींच असतात. फुलांच्या रंगांत केवळ फरक असतो. याशिवाय केसरांच्या आकारांत फरक असतो तो अगदीं बारकाईने पाहिल्याखेरीज कळण्याजोगा नाही. रुईचीं फुलें नीलमिश्र श्वेत असतात. तर मंदाराची ताम्रमिश्र किंवा केवळ श्वेत वर्णाचीं असतात. रुईचें खोड लहान आणि फांद्या तळातून, तर मंदाराचें खोड जाड कणखर आणि ताठ असून फांद्या भूमीपासून बऱ्याच अंतरावर असतात. शास्त्रीय परिभाषेंत रुईला प्रोसेरा म्हणजे पातळ आणि मंदाराला जायगँशिया म्हणजे भव्य, धिप्पाड अशी नावें आहेत.

मन्दाराणामनुतटरुहां छायया वारितोष्णाः ॥ (कन्यकाः) उत्तरमेघ ६
वासश्चित्रं मधु नयनयोर्विभ्रमादेशदक्षं
पुष्पोद्भेदं सहकिसलयैर्भूषणानां विकल्पान् ॥
लाक्षारागं चरणकमलन्यासयोग्यं च यस्याम्
एकः सूते सकलमबलामंडनं कल्पवृक्षः ॥ १२ ॥ उत्तरमेघ

अनेक प्रकारचीं वस्त्रें, डोळ्यांना चंचलता आणणारें मद्य, अलंकार म्हणून उपयोगी पडणारे पल्लव आणि फुलें, त्याचप्रमाणें पदपद्मास लावण्याजोगा लाखेचा आळिता, हीं स्त्रियांचीं मंडनसामग्री ज्या एका वृक्षापासून मिळते तो कल्पवृक्ष अलकानगरींत आहे असें कवि यक्षाच्या तोंडाने सांगत आहे. शब्दशः अशी सामग्री कोणताच वृक्ष पुरवीत नाही. परंतु अत्युक्ति वजा घालतां अशी सामग्री मंदारापासून मिळूं शकते असें दिसून येतें. मंदाराला पानें फुलें तर असतातच पण त्याच्या फळांत त्रियाभोवतीं कापूस असतो. त्याचा उपयोग वस्त्राला ऊबदार 'फूल' म्हणून होऊं शकतो. त्याच्या खोडावर लाखेचे किडे पोसणें शक्य आहे. तसेंच त्याच्या सालीपासून वस्त्राला योग्य धागा मिळूं शकतो. सालींतून निघणारे तंतु विणून त्यामध्ये फळांतील कापूस गुंतवून द्यावयाचा, म्हणजे मऊ आणि उबदार वस्त्र होऊं शकतें. अशींच वस्त्रें पूर्वीं करीत असत असें दिसतें.

**कांचन.** या वृक्षालाहि कोणी कोणी मंदार म्हणतात. हा उद्यान-वृक्ष आहे. संस्कारानें याच्यांतून सुंदर जाति निर्माण झाल्या आहेत. कोविदार ही यापैकींच एक उत्कृष्ट जाति असून तिचें वर्णन ऋतुसंहारांत आल्याचें पूर्वीं लिहिलेंच आहे. या सर्व जातींची फुलें इतकीं नाजूक असतात की तीं खुडल्यानंतर त्वरित सुकून जातात. तीं अलंकार म्हणून अंगावर लेणें व्यर्थ आहे. मंदार पुष्पें मुकुटांत किंवा केसांत अलंकार म्हणून खोविंत असें काव्यनाटकांत अनेकशः म्हटलें आहे. म्हणून कालिदासोक्त मंदार कांचन नव्हत हें उघड आहे.

मंदारपुष्पैरधिवासितायां यस्याः शिखायामयमर्पणीयः । वि. ४:३५.
जिच्या डोक्यावरील मंदारपुष्पामध्ये हा मणि ठेवण्यायोग्य आहे.

अलकपतितैर्यत्र मन्दारपुष्पैः । उत्तरमेघ.

**पारिभद्र**. पांगारा. पारंगा हा वृक्ष प्रसिद्ध आहे. यालाच कांही विद्वान मंदार म्हणतात. याला कांहींशी पळसासारखीं त्रिदली पानें येतात. तीं उन्हाळ्यांत झडतात. त्यामुळे त्याचा उपयोग छायावृक्ष म्हणून ऐन वेळीं होत नाही. तथापि पुरेसें पाणी मिळालें तर थोड्याच दिवसांत नवीन पालवी येते, नंतर फुलें येतात. फुलें भडक तांबडीं असतात. आकृति पळसाच्या फुलांसारखीच परंतु बाहेरची एक पाकळी फारच मोठी आणि इतर चार पाकळ्या अगदींच लहान असतात. नंतर शेंगा येतात. कांही झाडांना पांढरीं फुलें येतात. फुलें केसांत खोवण्याजोगीं असतात.

मंदार हा पांगारा असावा कीं रुईचा भाऊ असावा या प्रश्नाचा निर्णय करण्याकरतां एक विचार उपयोगी पडण्याजोगा आहे. ज्या तरूला पांगारा असें नांव आहे त्यास चुकीने दुसरें नांव दिलें गेलें असावें हा एक पक्ष, आणि ज्या तरूला दुसरें नांवच नाही त्याचें नांव मंदार असावें हा दुसरा पक्ष. यांतला अधिक संभवनीय कोणता? असाच रोकडा प्रश्न आहे. त्याचें उत्तर दुसऱ्या पक्षीं देणें योग्य आहे. याशिवाय आणखी एक प्रमाण आहे तें असें:—पांगाऱ्याला फुलें येतात; त्यांचे घोस असतात, स्तबक नसतात. कवीने मंदाराला स्तबक येतो असें स्पष्ट म्हटलें आहे. म्हणून पांगारा हा मंदार नव्हे.

[ मन्दार १५ ]

## रंभा, कदली, कंदली,

या तीन शब्दांचा एकत्र विचार करणें अवश्य आहे. कदली म्हणजे केळी आणि कंदली म्हणजे चवेणी असें मानतात. कदलीचा उल्लेख मेघदूतांत आहे तो वर दिलाच आहे. कुमारसंभवांत पार्वतीचें शरीरसौंदर्य वर्णन करीत असतांना कवी म्हणतो.

नागेन्द्रहस्ताः त्वचि कर्कशत्वात् एकान्तशैत्यात् कदलीविशेषाः ।
लब्ध्वापि लोके परिणाहि रूपं जातास्तदूर्वोरुपमानबाह्याः ॥ १. ३६

तिच्या मांड्यांना हत्तीच्या सोंडेची उपमा दिली असती पण त्यांत कठोरपणा फार. कदाचित् केळीची ( किंवा रानकेळीची ) उपमा दिली असती पण त्या पडल्या आतिशय थंड. म्हणून दोनहि वस्तूंना वाटोळेपणा असून सुद्धा त्या उपमेस अयोग्य ठरतात.

या ठिकाणी कदलींत प्रकार आहेत. त्यांतला एक प्रकार केळ असे दर्शविलें आहे. आता इतर प्रकार कोणते? चवेणी हा एक प्रकार संभवतो. परंतु जे प्रकार वर्ज्य म्हणून मुद्दाम सांगितलें त्यांतलाच तो म्हटला पाहिजे. कारण प्रस्तुत प्रसंगीं ज्याच्या मनांत केळ हें उपमान येईल त्याच्या मनांत चवेणीहि येईल. कारण दोहींमध्ये परिणाहि रूप आणि एकांन्त शैत्य हे गुण आहेतच. तेव्हां जो प्रकार सहज उपमान म्हणून येण्यासारखा नाही असा निदान एक तरी प्रकार असला पाहिजे तो कोणता? तो कर्दळ हा संभवतो. कारण केळ आणि कर्दळ यांत साम्य बरेंच आहे. पुष्कळ प्रसंगीं लौकिक व्यवहारांत केळीऐवजीं कर्दळी आपण वापरतोंहि. पण प्रस्तुत प्रसंगीं म्हणजे स्त्रीच्या मांडीला उपमान योजण्याच्या प्रसंगीं मात्र कोणी केळी ऐवजीं कर्दळी मनांत आणणार नाही. कारण आकाराने त्या लहान असतात आणि

त्यावर पेरी असल्यामुळे रुपानेहि त्या विसदृशच ठरतात. त्यांत सलग वाटोळेपणा पाहिजे तो नसतो. तेव्हां प्रस्तुत प्रसंगीं आपोआप वर्ज्य त्या कर्दळी आणि कवीने स्वतः विशेप मति चालवून वर्ज केल्या त्या केळी आणि र्‍हवेणी. या तिन्हींना मिळून कदली शब्द लागू असावा असें दिसतें. मेघदूतांतील उद्यानवर्णनांत कदलीचा अर्थ केळीपेक्षा कर्दळी असाच घेणें अधिक युक्त आहे. उद्यानांत केळी नसतात किंवा नसाव्यात असें नाही. पण प्रेक्षणीय म्हणून मुद्दाम उल्लेख करणें असल्यास केळीपेक्षां कर्दळींनाच अधिक मान मिळणें योग्य आहे. तेथे क्रीडाशैलाचा प्रेक्षणीय परिवार म्हणून कनककर्दळींचा उल्लेख आहे. अर्थात येथें सोनकेळीपेक्षां सोनकर्दळींचेंच औचित्य अधिक आहे. कदली म्हणजे केवळ केळी असत्या तर विशेपाः असें म्हणण्याचें कारण नव्हतें.

रंभा हें केळीचें विशेप नांव आहे. स्त्रियांच्या मांडीला केळीची उपमा दिल्याचे उल्लेख आहेत ते असेः—

यास्यत्यूरुः सरसकदलीस्तंभगौरश्चलत्वम् । उत्तरमेघ ३४
केळीच्या रसपूर्ण स्तंभाप्रमाणें गौरवर्ण असलेली तिची मांडी हालेल !

रम्भोरु कच्चिन् मनसो रुचिस्ते । रघु. ६. ३५ सुन्दरि तुला हें आवडतें कां ?
रानकेळीचा समावेश कदली या वर्गांत होतो. रंभा हा जसा केळीचा वाचक् पृथक शब्द आहे तसा कन्दली हा रानकेळीचा शब्द आहे.

आविर्भूतप्रथममुकुलाः कन्दलीश्चानुकच्छम् । पूर्वमेघ. २१
कांठांकाठाने रानकेळींना नवे अंकुर आलेले पाहून .........ज्यांचा कंद भूमींत लीन असतो ती कदली किंवा कन्दली अशी व्युत्पत्ति शोभण्याजोगी आहे. [ कदली १६ ]

## माधवीलता, मालती आणि यूथिका

यक्षाच्या उद्यानांत माधवीलतेचा मंडप असल्याचें सांगितलें आहे. ही माधवीलता आजहि उद्यानलता म्हणून बहुमान पावलेली आहे. या लतेच्या पानांना नागमोडी काठ असतात. त्यांच्या मध्यावरील शीर उठावदार असते. तिचा रंग जांभळस असतो. हिच्या फुलांना सुट्या पांच पाकळ्या असतात. त्यांचा रंग पांढरा असून, एका पाकळीवर एक मोठा पिवळा ठिपका असतो. त्यामुळे फूल फार सुंदर दिसतें. फुलामागून फळें येतात. त्यांना तीन तीन पंख असतात. माधव म्हणजे वैशाखमास. यावरून या लतेच्या फुलांचा भर वैशाखांत असावा असें वाटतें. परंतु वस्तुस्थिति तशी नाही. वैशाखांत हिच्या फुलांचा भर ओसरतो आणि फळें पक्व होऊन इतस्ततः पसरतात. फळें बारीक असून त्यांना लांब लांब पातळसे पंख असतात. विक्रमोर्वशीय नाटकांत या लतेचें विस्तृत वर्णन आलें असून ती वर्षाऋतूच्या आरंभीं (४. ३८) पुष्परहित आहे असेंच दर्शविलें आहे.

कोणी याच लतेला मधुमालती म्हणतात. परंतु दुसऱ्या एका लतेला 'मालती' हें नाव असल्यामुळे तेंच नांव अंशतः सुद्धा या लतेस नसावें असें वाटतें. [माधवी १७]

मालतीचा उल्लेख प्रस्तुत काव्यांत अन्यत्र आलेला आहे. यक्ष म्हणतो ' मेघा, तूं, माझ्या घरीं पोचल्यावर माझ्या पत्नीस मालतीच्या परागांची भेट देऊन आश्वासन दे...

प्रत्याश्वस्तां सममभिनवैर्मालतीनां रजोभिः । उ. मे. ३८

मालती आणि माधवी या त्या वेळीं पुष्कळ प्रचारांत होत्या, पण सर्वांत अधिक प्रचार यूथिकांचा होता असें दिसते. कारण सहज जातां जातां उल्लेख करण्याचा प्रसंग आला असतां यूथिकांचाच उल्लेख केलेला आढळतो. यक्ष म्हणतो—

विश्रान्तः सन् व्रज वननदीतीरजानां निषिंचन्
उद्यानानां नवजलकणै र्यूथिकाजालकानि । पूर्वमेघ २६

विश्रांति घेऊन पुढें जातां जातां वननदीच्या काठाला लावलेल्या उद्यानांतील यूथिकाकुंजांना नव्या पाण्याचा शिंतोडा दे, बरं का. यूथिकागोत्रांतील सर्व लता सायंकाळीं फुलणाऱ्या आहेत. त्यांचीं फुलें सकाळीं गळून पडण्याच्या बेतांत असतात. कवीने हा गुण या काव्यांत फार मार्मिक रीतीने व्यक्त केला आहे. दक्ष मेघाला सर्व संदेश देऊन झाल्यावर म्हणतो. 'संदेश पोचल्यावर तिचा उलट संदेश आणून मला सांग. अशा रीतीने अगदी प्रातःकुंदाप्रमाणें गळून पडण्याच्या बेतांत असलेलें माझें हें जीवित तूं सावरून धर.

प्रातःकुन्दप्रसवशिथिलं जीवितं धारयेथाः । उ. मे. ५३

रघुवंशांतील उल्लेख शास्त्रदृष्ट्या मार्मिक आहे. कारण त्यांत सायंविकास हा भ्रमरसंचाराशीं संबद्ध आहे असें दर्शविलें आहे.

वनेषु सायंतनमल्लिकानां विजृंभणोद्गन्धिषु कुड्मलेषु ।
प्रत्येकनिक्षिप्तपदः सशब्दं संख्यामिवैषां भ्रमरश्चकार ॥ रघु.

वनामध्यें सायंविकासी मोगरीच्या कळ्या उमलल्यामुळे सुगंध पसरलेला होता. प्रत्येक फुलांत मुक्काम करीत भुंगा चालला होता. जणूं तो त्यांची गणतीच करीत होता.

## बिंब, तोंडलें

बिंबलतेचा उल्लेख काव्यांत नाहीं, पण बिंबफलाचा आहे. स्त्रियांच्या ओठाचें. तें ठराविक उपमान आहे. पक्वबिंबाधरोष्ठी हें यक्षपत्नीचें वर्णन प्रसिद्ध आहे.

या फळाला आणि वेलालाहि तोंडलें असें नांव पडण्याचें कारण फळांचा लाल रंग हेंच आहे हे उघड आहे. ज्यांचा रंग तोंडासारखा लाल तें तोंडलें. [बिम्ब १८]

● मेघदूतांतील वनश्रीचें परीक्षण येथें संपलें आहे. पूर्वभागापुरतें बोलावयाचें तर तें केवळ बिनचूक आहे इतकेंच नव्हे तर ज्या काल्पनिक प्रसंगांत तें गोविलें आहे, त्या प्रसंगाच्या दृष्टीने अत्यंत मार्मिक आहे. दुसऱ्या भागांतील यक्षाच्या उद्यानाचें वर्णन अयोध्येंतील एखाद्या उद्यानाच्या वर्णनासारखेंच भासतें. त्यांत मंदार हाच काय तो एक विशेष उल्लेखिला आहे. आपल्या विषयापुरतें त्याचें कल्पवृक्षत्व कवीने उत्तम प्रकारें सिद्ध केलें आहे. त्या काव्यांत एकंदर ४१ उद्भिदांचे उल्लेख आहेत. त्यांपैकीं २७ ऋतुसंहारांत येऊन गेलेले आणि १४ नवीन आहेत.

## महाकवीचीं नाटकें

कालिदासाच्या लघुकाव्यानंतर त्याच्या नाटकांचा परामर्ष घेणें ओघानेच प्राप्त आहे. हीं नाटकें तीन आहेत. या नाटकांतील वनश्रीचीं वर्णनें काव्यांतील वर्णनांच्याच धरतीचीं आहेत. तथापि त्यांत कांहीं पूर्वोक्त उद्भिदांचेंच निराळ्या शब्दांत वर्णन आहे, आणि कांहीं नवीन उद्भिदेंहि उल्लेखिलीं आहेत. मालविकाग्निमित्र आणि विक्रमोर्वशीय यांत उत्तम उद्यानवर्णनें आढळतात. परंतु वनश्रीवर्णनें आणि नवीन उल्लेख शाकुंतलांतच अधिक आढळतात. स्थलदृष्ट्या विन्ध्य आणि हिमालय यांमधील प्रदेशास अनुलक्षून तीनहि नाटकें लिहिलेलीं दिसतात. विक्रमोर्वशीय आणि शाकुंतल यांत स्वर्गभूमीचे उल्लेख आहेत. काळ बहुधा निदाघच कल्पिलेला दिसतो. विक्रमोर्वशीयांत वर्षाकालाचा आरंभहि आणला आहे.

## विक्रमोर्वशीय

**रक्तकदंब.** कदंबासंबंधीं सविस्तर लिहिलेंच आहे. त्यांत निर्देश केलेला कदंब तोच हाहि असावा, हरिद्रक किंवा हेदकदंब याच्या अपेक्षेने या कदंबाचें लाकूड लाल म्हणून हें नांव पडलें असणें संभवतें. सर्व वर्णन कदंबाचेंच आहे.

रक्तकदंबः सोयं प्रियया धर्मान्तशंसि यस्यैकम् ।
कुसुममसमग्रकेसरं विपमसपि कृतं शिखाभरणम् ॥ वि० ४/३०

हाच तो कदंब, ज्याचें अर्धवट उमललेलें फूल माझ्या प्रियेने डोक्यावर धारण केलें. कारण त्याने उन्हाळा संपला अशी सूचना दिली.

**लवली.** रायआवळी. गर्भिणीच्या मुखावर जो पांढुरकेपणा येतो त्यास लवलीदलांची उपमा दिली आहे. रायआवळा हा वृक्ष प्रसिद्ध आहे. हा उद्यानांत लावण्याची पद्धत आहे.

लवलीदलपांडुराननच्छायम् । ( वपुः ) वि० ५.८. [ लवली १९ ]

**सल्लकी.** सालई. साल किंवा झाल म्हणून जो वृक्ष मागे वर्णिला तो हा वृक्ष असें म्हणतात. याच्या डिकशा हत्ती खातात.

अयमचिरोद्गतपल्लवमुपनीतं प्रियकरेणुहस्तेन ।
अभिलषतु तावदासव– सुरभिरसं सल्लकीभङ्गम् ॥ वि० ३ १०.

या हत्तीची प्रिया त्याला सल्लकीच्या नवी पालवी आलेल्या डिकशा आणून देत आहे. त्या त्याला खाऊं दे.

**कर्णिकार.** याच्या अर्थासंबंधीं मतभेद आहे म्हणून आणखी एक उतारा विचार करण्याजोगा आहे तो असा :

परिजनवनितारार्पिताभिः
परिवृत्त एष तिभवति दीपिकाभिः ॥
गिरिरिव गतिमानपक्षलोपात्
अनुतटपुष्पितकर्णिकारयष्टिः ॥ वि० ३. ३

राजा इकडे येत आहे. त्याच्या सभोवार सेविकांनीं दिपिका धरल्या आहेत. पंख न तुटलेला एकादा पर्वतच जणू उतारावरील फुललेल्या कर्णिकारासह चाल करीत आहे ! बाहव्याची फुलें पिवळीं असून त्यांच्या पाकळ्या निरांजनाप्रमाणें खोलगट आणि केसर किंजल वातीप्रमाणें वळणदार असतात.

## मालविकाग्निमित्र.

**पंकाच्छिद फल.** याचा उल्लेख एका उपमेंत आलेला आहे. बुद्धिमान् माणसाच्या समागमानें मूर्खाला बुद्धिमत्त्व येतें तें गढूळ पाण्यास पंकच्छिदाच्या योगाने येणाऱ्या स्वच्छते- सारखें होय असें म्हटलें आहे.

पंकच्छिदः फलस्येन निकषेणाविलं पयः । मा० २.७.

निर्मळी म्हणून एक फळ मिळतें तें हें होय. निर्मळीचा वृक्ष २०,२५ हात उंच जातो. त्याचीं पानें बोटभर लांब आणि एकादें अंगुलभर रुंद असतात. फुलास पाकळ्या पाच असून किंजल लांबट असतें. बी अर्धगोल असून $\frac{1}{4}$ अंगुल व्यासाचें असतें.

[ पङ्कछिद् २० ]

**बीजपूरक, महाळुंग.** हें फळ राजाकडे जातांना उपायन म्हणून नेण्यायोग्य अशा अर्थानें आलें आहे. हें उपवन्य आहे. याच्याच गणगोत्रांतलीं आजचीं प्रसिद्ध फळें

म्हणजे संत्री, मोसंबी, नारिंग हीं होत. याच्या वन्य प्रकारांत बिया फार असून रस थोडा आणि आंबट असतो. संस्काराने बीजाभोंवती रस अधिक निर्माण होतो हें प्रसिद्ध आहे. संस्कार त्यावेळीं घडलेला होता असें दिसतें. कारण उपवनांतून हें फळ तोडून नेण्याचा देखावा नाटकांत वर्णिला आहे. ( मा. ३ )

उपायनार्थमागच्छ गृहीत्वा बीजपूरकम् । [ बीजपूरक २१ ].

**तपनीयाशोक.** याचा अर्थ सोनेरी अशोक. रक्ताशोक विशेष प्रसिद्ध आहे. त्याचाच हा भाऊबंद. तांबडीं आणि सोनेरी दोनहि रंगाचीं फुलें एकाच झाडाला येतात असेंहि आढळतें. ( मा. ३ )

**तिलक.** वैशाखांतील वनश्रीचें वर्णन करतांना कवि म्हणतो.

आक्रान्ता तिलकक्रियाऽपि तिलकैर्लग्नद्विरेफांजनैः ।
सावज्ञेव मुखप्रसाधनविधौ श्री र्माधवी योषिताम् ॥ माल० ३.५.

तिलकांच्या फुलांना भुंगे चिकटले आहेत. ते काजळाप्रमाणें काळे असल्यामुळे वन-श्रीच्या कपाळीं तिलक लावल्याची शोभा आली आहे. एकूण वैशाखी वनश्रीने मुखशोभा करण्याच्या बाबतींत स्त्रियांवरहि मात केली म्हणावयाची !

येथे तिलक कोणता असा प्रश्न आहे. तिलक हें नांव आज रूढ नाही. तिलक म्हणजे तिल किंवा तिळासारखें एखादें झाड असावें असें वाटतें. तीळ दोन प्रकारचे आहेत. एक गोडा तीळ आणि दुसरा कारळा तीळ. गोडा तीळ प्राचीन असून कारळा त्यापेक्षां नवीन खुरासानी म्हणजे खुरासान या यवनी देशांतून आलेला असें इतिहासांत सांगतात. गोड्या तिळांत रानतीळ आणि शेततीळ असे भेद आहेत. रानतिळाला प्राचीन वैदिक वाङ्मयावरील टीकाग्रंथांत जर्तिल अशी संज्ञा असून तो तिळाऐवजीं वापरण्याला योग्य गणला आहे. तिळाचें झुडुप कोरांटीच्या झुडुपाएवढेंच असतें. फुलेंहि साधारण कोरांटीच्या फुलाएवढीच असून तशीच मुखद्युति असतात, म्हणजे असें कीं त्याच्या पाच पाकळ्यां-पैकीं एक खालची इतरांहून लांबट असल्याने अधरोष्ठतुल्य असते. तिळाचें फूल कोरांटीच्या फुलापेक्षा अधिक वळणदार असतें. देठापासून खाली वाकून तें बाजूला तोंड उघडतें. त्याचा रंग पिवळा, केशरी, किंवा गुलाबी असतो. त्यांतल्या अधरावर दाट जांभळ्या रंगाच्या रेषा असतात. रानतिळामध्ये रेषांच्या ऐवजीं मोठा भडक जांभळा टिळाच असतो. त्यामुळे रानतीळ हाच तिलक असावा असें वाटतें. तिळांला मुख्य खोडाच्या शेंड्याला किंवा शाखांच्या शेंडयाला फुलाच्या मंजिरा येतात. कारळ्या तिळाला मंजिरा नसतात. शेवंतीसारखें एकेक फूल एकेका पानाच्या बगलेंत येतें. रघुवंशांत तिलकमंजरीचा उल्लेख आहे. त्यावरून तिलक हा रानतीळच ठरतो.

उपचितावयवा शुचिभिः कणैरलिकदंबकयोगमुपेयुषी ।
सदृशकान्तिरलक्ष्यत मंजरी तिलकजालकजालकमौक्तिकैः ॥ रघुवंश ९. ४४.

शुद्ध परागकणामुळे तिलकाच्या मंजिरीला मोठी शोभा येई. तिजवर भुंगे येऊन बसत. तेव्हा वाटे जणूं वनस्थळीने आपल्या केसांत मोत्यांची जाळीच बसविलेली आहे

यावरून तिलक हा कारळा नव्हे एवढें स्पष्ट होतें. [ तिलक २३ ]

**रक्तचंदन.** याचें गंध औपाधिलेप म्हणून वापरतात हें प्रसिद्ध आहे. याच संदर्भात याचा उल्लेख आला आहे. ( मा. ४ ) हें झाड श्वेतचंदनाहून अगदी वेगळ्या गणांतलें आहे. याचा गण द्विदळ धान्यांचा. [ रक्तचन्दन २३ ]

**पद्म.** पद्मांचीं पानें पाण्याच्या वर निघून कांही अंतरावर उमलतात, परंतु इतर कमळांचीं पानें पाण्याच्या सपाटीसच राहातात असा भेद मागील लेखांत दर्शविला आहे. तोच भेद स्पष्ट करणारें वचन प्रस्तुत नाटकांत आहे. तें असें:—

पत्रच्छायासु हंसा मुकुलितनयनाः दीर्घिकापद्मिनीनाम्। अंक २. १२.

लांबट विहिरींमधील पद्मांच्या पानांच्या छायेंत हंस डोळे मिटून विसावा घेत आहेत. पानें पाण्याच्या वर निघत असल्याशिवाय त्यांची छाया हंसांच्या उपयोगी पडणें शक्य नाही.

## शाकुन्तल

**पिंडखर्जुर आणि तिंतिणी.** शाकुंतलाच्या दुसऱ्या अंकांत विदूषक म्हणतोः—

पिंडखर्जूरैरुद्वेजितस्य तिंतिण्यामभिलाषः। पिंडखर्जूर म्हणजे लहान गोटीवजा खजूर किंवा खारीक असा अर्थ असावा. खजूरांचा कंटाळा आला म्हणजे चिंच खावी असें वाटतें हा भावार्थ. तिंतिणी=चिंच. [ पिंडखर्जूर २४ तिंतिणी २५ ]

**उशीर. वाळा.** हें एक सुवासिक मुळें असलेलें गवत आहे. शीतोपचार म्हणून याचा उपयोग करतात. याच अर्थानें त्याचा उल्लेख आहे.

स्तनन्यस्तोशीरं किमपि कमनीयं वपुरिदम्। ३. ६

स्तनावर वाळ्याचा लेप लावलेलें हें शरीर विशेष लोभनीय आहे. [ उशीर २६ ]

**इंगुदी, हिंगण.** हें रुक्ष प्रदेशांत उगवणारें काटेरी झुडुप आहे. याचें फळ साबणाप्रमाणें फेसाळतें. त्यातून औषधोपयोगी तेल निघतें.

**श्यामाक. सावा.** एक कनिष्ठ प्रतीचें धान्य आहे. शकुंतला सासरीं जात असतां आश्रममृग तिला सोडीत नाही. तें पाहून कण्व ऋषि म्हणतातः—

यस्य त्वया व्रणविरोपणमिङ्गुदीनां
तैलं विषिच्यत मुखे कुशसूचिविद्धे।
श्यामाकमुष्टिपरिवर्धितको जहाति
सोयं न पुत्रकृतकः पदवीं मृगस्ते॥ शा० ४. १६

या हरिणाच्या तोंडास कुश टोंचल्यानें व्रण झाला होता. तेव्हा इंगुदी तेल लावून तूं तो बरा केलास. साव्यानें मुठी भरून त्याला चारलेंस. अशा रीतीनें वाढवलेला हा हरिण तुला सोडीत नाही. [ इंगुदी २७ श्यामाक २८ ]

**रक्तकुवलय.** कुवलय हा शब्द बहुशः नलिकमलास लावलेला आहे. परंतु तांबड्या कमळालाहि तो लावलेला शाकुंतलाच्या सहाव्या अंकांत आढळतो. कुवलय शब्दाच्या व्युत्पत्तींत रंगाचा संबंध नाही. तेव्हा तो शब्द मूळचा विशिष्ट रंगांच्या कमळाचा वाचक नाही. परंतु रूढीनें तो नीलकमलवाचक झाला. कु म्हणजे कुटिल, वाकडें वलय म्हणजे वर्तुळ. कमळाच्या पाकळ्या त्याच्या अक्षावर कशा वाटोळ्या रचलेल्या असतात तें पाहिलें असतां त्या वाटोळ्या जिन्याच्या पायऱ्या प्रमाणें रचलेल्या असतात असें आढळतें. प्रत्येक पाकळी एका शेजारच्या पाकळीच्या खालीं आणि दुसरीच्या वर असते. या रचनेला अनुलक्षून कु शब्द योजलेला दिसतो. ही रचना हा कमळांचा विशेष आहे. शाल्मली, सप्तच्छद, कुटज इ. फुलांत रचना वेगळी असते. पाच पाकळ्या एका सपाटींत असतात.

**हरिचंदन.** बहुधा चंदन आणि हरिचंदन एकच असतील, किंवा हा एक चंदनप्रकार असेल.

आमृष्टवक्षोहरिचंदनांका मंदारमाला हरिणा पिनद्धा । शा० ७२

इंद्राने माझ्या गळयांत मंदारमाला बांधली ती माझ्या वक्षस्थलावरील हरिचंदनाने माखली गेली ! ( असा माझा सन्मान झाला ! )

## उद्भिदांचें नामकरण

| काव्यांतील नांव व पर्याय | वृक्षातील क्रमांक | शास्त्रीय नांव | | शा. नांव देणाराचे नामचिन्ह |
|---|---|---|---|---|
| | | गोत्रनाम व त्याचा अर्थ | जातिनाम व त्याचा अर्थ | |
| इंगुदी | २७ | Balanitis | Roxburghii<br>संस्मरणार्थ | Planch |
| उदंबर | २ | Ficus<br>प्लक्ष | Glomerata<br>गाठाळ | R. |
| उशीर<br>वाळा | २६ | Andropogon<br>कूर्चकणिश | Muricatus<br>खरखरीत | Retz |
| कदली<br>रंभा | १६ | Musa<br>संस्मरणार्थ | Sapienteam<br>सुजनार्थ | L. |
| कलारी<br>कळलावी | १३ | Gloriosa<br>उदार | Superba<br>श्रेष्ठ | L. |
| कीचक<br>कळक ? | ९ | Dendrocalamus<br>महाकाष्ठ | Hamiltonii<br>संस्मरणार्थ | Nees. |
| जपा<br>जास्वंदी | १० | Hibiscus<br>( ग्रीक नाम ) | Rosasinensis<br>चिनी गुलाब | L. |
| जम्बू<br>जांभूळ | १ | Eugenia<br>संस्मरणार्थ | Jambolana<br>जांभळा | Lam. |
| ताल<br>ताड | ३ | Borassus<br>महागोपयुक्त | Flabellifer<br>व्यजनमद | L. |
| तिंतिणी<br>चिंच | २५ | Tamarindus<br>( अरबी नाम ) | Indica<br>हिंदी | L. |
| तिलक<br>रानतीळ | २२ | Sesamum<br>( ईजिप्तीनाम ) | Indicum | L. |
| देवदारू | ८ | Pinus<br>टोकदार | Deodara<br>देवदार | Roxb. |
| नागदमनी<br>नागदवणी | १४ | Crinum<br>( ग्रीक नांव ) | Asiaticum<br>—देशीय | L. |

| काव्यांतील नांव व पर्याय | लेखांतील क्रमांक | शास्त्रीय नांव<br>गोत्रनाम व त्याचा अर्थ | शास्त्रीय नांव<br>जातिनाम व त्याचा अर्थ | शा. नांव देणारे नामविद् |
|---|---|---|---|---|
| निचुल | ४ | Calamus<br>यष्टिरूप | Rotang | L. |
| पङ्क्चिछद<br>निर्मळी | २० | Strychnos | Potatorum<br>पेयार्थ | L. |
| पिण्डखर्जुर<br>गोटीखजूर | २४ | Phoenix<br>( ग्रीकनाम ) | Sylvestris<br>वन्य | R. |
| बिम्ब<br>तोंडलें | १८ | Cephalandra<br>शीर्पाभकेसर | Indica<br>हिंदी | Maud |
| बीजपूरक<br>महाळुंग | २१ | Citrus<br>( ग्रामनाम ) | Medica<br>औषधी | L. |
| मंदार | १५ | Calatropis<br>कान्तपुष्प | Gigantea<br>भव्य | Br. |
| माधवी | १७ | Hiptage<br>पक्षिफली | Madablota<br>( बंगाली रूप )<br>माधवीलता | D.&G. |
| रक्तचंदन | २३ | Pterocarpus<br>पक्षफली | Santalinus<br>चंदन | L. |
| लवली<br>राय-आवळी | १९ | Phyllanthus<br>पर्णपुष्पी | Distichus<br>द्विपङ्क्तिक | Muell |
| वानीर<br>वेत | ५ | Calamus<br>यष्टिरूप | Tenuis ? | Roxb. |
| वेतस<br>वेत्त | ६ | Calamus<br>यष्टिरूप | Viminalis | Willd. |
| शिरीष | ११ | Mimosa<br>अनुकारी | Speciosa<br>सुंदर | Jacq. |
| श्यामाक<br>सावा | २८ | Paucum<br>भाकरीचें | Miliare | L. |
| सरल | ७ | Pinus<br>टोकदार | Longifolia<br>लंबपर्ण | Roxb. |
| स्थलकमल | १२ | Colchicum | Luteum<br>पीत | Baker |

# श्लेषाच्या निमित्तानें

रा. श्री. जोग

कांही वर्षांपूर्वी, म्हणजे इ. स. १९३४ या वर्षी, ज्ञानेश्वरदर्शनामधील माझ्या लेखांत मी ज्ञानेश्वर हे श्लेष शब्दाच्या बाबतींत साहित्यशास्त्रीय परिभाषेंत घोटाळा करीत आहेत असें म्हटलें होतें. ज्ञानेश्वरांच्या भक्तांस मी त्यांचे अंगीं अज्ञान, निदान विपरीत ज्ञान, चिकटवीत आहें असें वाटलें. खरोखर अलंकारशास्त्राचें सम्यक् ज्ञान ज्ञानेश्वरांस नसलें तरी त्यामुळे त्यांच्या कवित्वांत उणें पडत नाही. कारण कवीस काव्यशास्त्राच्या ज्ञानाची आवश्यकता आहेच असें नाहीं. तसेंच ज्ञानेश्वरांचा खास प्रान्त जो अध्यात्म त्यालाहि अलंकारविज्ञानाची मुळींच गरज नाही. परंतु अध्यात्मज्ञान झालें की सर्व ज्ञान झालें या कल्पनेने म्हणा, किंवा ज्ञानदेवांच्या ज्ञानांत एवढेंहि न्यून सहन होत नाहीं म्हणून म्हणा, माझ्या त्या म्हणण्यावर आक्षेप घेण्यांत आले. त्यांतील सर्वांत अलीकडचा 'पांच संतकवी' या डॉ. तुळपुळे यांनी लिहिलेल्या ग्रंथांत आला आहे. स्वतःच्या समर्थनार्थ नव्हे, तर भ्रामक मत कसें रूढ होतें व विद्वानांच्या मनांतहि कसें घर करून राहतें याचें दिग्दर्शन करण्याकरिताच हें लिहीत आहें.

ज्ञानेश्वरांनी श्लेषाचा उल्लेख दोन वेळा केला आहे. त्यांत एके ठिकाणीं श्लेष शब्द त्यांनी रूपक या अर्थानें योजिला आहे ही गोष्ट स्पष्ट आहे. 'तेंवि भेदबुद्धिचिये तुळे। घालूनि पूर्वश्लेषाचें काटाळें। तूंकिलासि तें अवघें। पुरें करीं जी ॥ अ. १६, ओ. २८. या ठिकाणीं आपल्या गुरूवर याआधीं केलेल्या प्रदीर्घ रूपकाचा उल्लेख आहे. दुसऱ्या ठिकाणीं ते म्हणतातः—" म्हणौनि आखरीं सुभेदि। उपमाश्लेष कोंदाकोंदी। झाडा देईन प्रतिपदीं। ग्रंथार्थासि ॥ अ. १३, ओ. ११६५. या ठिकाणीं उपमा या अलंकार-नामाबरोबरच श्लेषाचा उल्लेख आल्याने तेंहि एक अलंकारनाम असावें असें वाटतें. पण त्या अलंकाराचें स्वरूप मात्र स्पष्ट होत नाही. शब्दप्रयोग एक, पण अर्थ दोन असा संस्कृतमधील श्लेष शब्दाचा अर्थ आहे. या अर्थानें ज्ञानेश्वरींत श्लेषाची कोंदाकोंदी तर राहोच, पण दोनचारहि उदाहरणें सांपडणें कठीण आहे. आणि तें साहजिकहि आहे. श्लेषानें आणतां येणाऱ्या अर्थचमत्कृती-साठीं कांही ज्ञानेश्वर काव्य लिहीत नव्हते. ज्ञानेश्वरींत उपमेखेरीज उत्प्रेक्षा आणि तिच्या खालोखाल रूपकांची गर्दी आहे. तेव्हा वर दिलेल्या पहिल्या उदाहरणांत श्लेषाचा रूपक असा जो अर्थ आहे, तोच याहि ठिकाणीं आहे असें अनुमान होतें. पण श्लेष शब्दाबरोबर रूपक हा शब्दहि ज्ञानेश्वर योजितात. " जें वृक्षरूपक परिभाषा। केलें उपाधिरूप अशेषा।" अ. १६, ओ. ४२ येथे रूपक शब्द आहे. एकाच अर्थी दोन्ही शब्द वापरण्याचा सैलपणा ज्ञानेश्वरांनीं स्वीकारला असें यावरून निष्पन्न होतें व हें सांगण्याच्या उद्देशानेच ते साहित्य-शास्त्रीय परिभाषेंत घोटाळा करितात असें मी म्हटलें होतें.

सैल शब्दयोजनेच्या या आक्षेपांतून ज्ञानेश्वरांची सुटका करण्याचे दोन मार्ग होते. पहिला असा की, श्लेष शब्दाच्या रूढार्थापेक्षा निराळा असा एक अर्थ संस्कृतमध्ये होता, व ज्ञानेश्वरांनी त्या अर्थानें श्लेष शब्दाची योजना केली आहे असें सांगणें. दुसरा असा की, संस्कृत साहित्यशास्त्र कांहीहि म्हणत असलें तरी, ज्ञानेश्वरसमकालीन मराठीचें साहित्यशास्त्र कांही निराळें सांगत होतें, व ज्ञानेश्वरांनीं त्या शास्त्रास धरून आपली शब्दयोजना केली असावी

असें म्हणणें. तिसराहि एक मार्ग म्हणजे मराठीचें हें साहित्यशास्त्र संस्कृतमधील श्लेषाच्या दुसऱ्या अर्थाशीं जुळणारें आहे असें दाखविणें. ज्ञानेश्वरांच्या श्लेष शब्दाच्या उपयोगाविषयी श्री. ह. वि. नेने व डॉ. मा. गो. देशमुख यांनी केलेली चर्चा या वर उल्लेखिलेल्या मार्गांचें अवलंबन करीत आहे. डॉ. तुळपुळे यांनी नेने यांच्यावर भिस्त ठेवून आपला निर्णय दिला आहे.

यापैकीं श्री. नेने यांनीं आपली कांहीं चर्चा कु. बाळूताई खरे यांच्या अलंकारमंजूषे-वर आधारलेली दिसते, व त्यांचेंच अनुकरण डॉ. देशमुख यांनीहि केलेलें दिसतें. कारण दोघां-नीहि अलंकारमंजूषेमधील शब्द जसेच्या तसे उद्धृत केले आहेत. दोघांनीहि काव्यालंकारकार भामह याच्याच आधारावर आपला वेगळा अर्थ सांगितला आहे. नेने तर असेंहि म्हणतात कीं, भामहाखेरीज इतर साहित्यशास्त्रज्ञांच्या ' श्लेष ' संबंधीच्या व्याख्या प्रचलित रूढार्थाला ( म्हणजे एकाच शब्दप्रयोगाच्या दुहेरी अर्थाला ) पुष्टि देतात, तर भामहाची व्याख्या ज्ञाने-श्वरकालीन ' श्लेष ' शब्दाच्या अर्थाशीं जवळजवळ येते. भामहाची श्लेषाची कल्पना पाहि-ल्यावर हें म्हणणें बरोबर नाहीं असें दिसून येईल. ती कल्पना पुढील श्लोकावरून येईल.

उपमानेन यत् तत्त्वं उपमेयस्य साध्यते । गुणक्रियाभ्यां नाम्नाच श्लिष्टं तदभिधीयते ।।
लक्षणं रूपकेऽपीदं लक्ष्यते, कामं अत्र तु । इष्टः प्रयोगो युगपद् उपमानोपमेययोः ।।
शीकराम्भोमदसृजः तुङ्गाः जलददन्तिनः । इत्यत्र मेघकरिणां निर्देशः क्रियते समम् ।।
श्लेषादेवार्थवचसोः अस्य च क्रियते भिदा । तत्सहोक्त्युपमाहेतुनिर्देशात् क्रमशः यथा ।।

यापुढे भामहाने शेवटल्या श्लोकार्धांत उल्लेखिलेल्या तीन प्रकारांचीं उदाहरणें तीन श्लोकांत देऊन श्लेषचर्चा संपविली आहे.भामहाने दिलेल्या वरील श्लोकांपैकीं दुसऱ्या श्लोकाचा अर्थ देतांना कु. बाळूताई खरे म्हणतातः—म्हणजे रूपकांत श्लिष्टासारखीच स्थिति दिसली तरी श्लिष्टांत उपमान व उपमेय यांच्यांत एकाच वेळीं स्थानभेद होऊं शकतो, म्हणजे मना-प्रमाणे कोणतेंहि उपमान व कोणतेंहि उपमेय गणितां येतें. ' हा अर्थ भामहाच्या लेखनांतून कसा निघूं शकतो हें कळणें कठीण आहे. आधीं स्थानभेद म्हणजे काय व नंतर ती कल्पना भामहाच्या शब्दांतून कशी प्राप्त होते ? मनांत येईल तें उपमान आणि उपमेय मानतां येईल हा अर्थहि त्यांतून कसा येतो ? तें समजावें म्हणून कु. बाळूताईनीं खरोखर भामहाचेंच पुढील श्लोकांतील उदाहरण समजावून द्यावयास हवें होतें; पण तसें न करितां त्यांनी आपलें निराळें उदाहरण पुढे दिल्याप्रमाणे घेतलें आहेः—

मित्रांग-स्पर्शानें झाला सुखी दयेचा सिंधु । लोचन-पद्मापासुनि गळती प्रेमाश्रूंचे बिंदु ।।

' यांत लोचन कसे तर पद्मासारखे असेंहि म्हणतां येईल, किंवा लोचन हेंच पद्म असेंहि म्हणतां येईल ' असा आपल्या उदाहरणाचा खुलासाहि त्यांनी दिला आहे, व म्हटलें आहे कीं, ' रूपकांत उपमेय आणि उपमान यांच्या स्थानाची अशी आलटापालट करतां येणें शक्य नाहीं.' कु. बाळूताई खरे यांच्या उदाहरणांतहि अशी आलटापालट होत नाहीं. लोचन हेंच उपमेय व पद्म हेंच उपमान राहतें. फार झाल्यास वेगवेगळ्या पद्धतीने लोचनपद्म हा समास सोडविल्याने एकदा उपमा आणि एकदा रूपक होईल. उपमेयउपमानभाव बदलणार नाहीं. इतकें सांगून शेवटीं ' भामहाने श्लेषाची व्याख्या डळमळीत ठेवली असें वाटतें ' असें त्या म्हणतात तें वेगळेंच. वस्तुतः उपमानउपमेय यांचा युगपद् प्रयोग इष्ट आहे याचा अर्थ ' एकाच शब्दप्रयोगाचा अन्वय उपमान आणि उपमेय या दोहोंकडेहि एकदम करितां येतो '

असाच घ्यावयास हवा. भामहाचा श्लेषाचा अर्थ त्याचा समकालीन दण्डी अथवा त्याच्या नंतरचे इतर संस्कृत अलंकारज्ञ यांच्या अर्थापेक्षा भिन्न मानण्याचें कारण नाही.

श्री. नेने यांनी बहुधा भामहाचें मूळ लेखन न पाहतां जवळ जवळ खरे यांच्या शब्दांतच भामहाचें म्हणणें मांडिलें आहे. ते शब्द असे—" रूपकामध्ये श्लिष्टाप्रमाणेच बरब्बर परिस्थिति भासत असली, तरी श्लिष्टामध्ये उपमान व उपमेय यांच्यांत एकाच वेळीं स्थानभेद होऊं शकतो, म्हणजे मनाप्रमाणे कोणतेंहि उपमान व कोणतेंहि उपमेय अशी आलटापालट होऊं शकते. अशी गोष्ट रूपकांत होत नाही." कु. बाळूताई खरे यांचा उल्लेख मात्र नेने यांनी केला नाही. डॉ. देशमुख यांनी तर नेने यांच्याइतकाहि खरे यांच्या शब्दांत फरक केला नाही, आणि तें दुसरीकडून घेतलें असल्याची खूण म्हणून अवतरण–चिह्नामध्ये तें घातलें आहे. पण त्यांनीहि कु. बाळूताई खरे यांचें नांव न सांगतां थेट भामहाचेंच म्हणजे त्याच्या ग्रंथाचें नांव निर्देशिलें आहे. भामहाच्या लेखनांत नसलेला, पण खरे यांना दिसलेलाच नेमका अर्थ डॉ. देशमुखांस सुचावा, आणि तोहि अगदी त्यांच्याच शब्दांत कानामात्रेचाहि फरक न होतां सांगतां यावा ही गोष्ट चमत्कृतिजनक आहे यांत शंका नाही. खरोखर अवतरणचिन्ह घातल्यावर भामहालंकाराचाच निर्देश न करितां खरे यांचाहि निर्देश तळटीपेंत करावयास हवा होता. भामहाविषयीची एतद्विषयक माहिती डॉ. देशमुख यांनी खरे यांच्या पुस्तकांतून घेतली आहे याचा आणखीहि एक पुरावा असा की खरे यांच्याप्रमाणेच डॉ. देशमुख हेहि 'श्लेष हा शब्द प्रथमतः मुळीच प्रचारांत नसून श्लिष्ट हा शब्द प्रचारांत होता' असें चुकीचें विधान करितात. देशमुख तर श्लेष शब्द वामनाने प्रथम प्रचारांत आणला असें म्हणतात व तीन ठिकाणीं तीन वेगवेगळ्या अर्थांनी वामनानें तो शब्द कसा वापरला आहे तें सांगतात. पण श्लेष शब्द, गुण आणि अलंकार या दोन्ही अर्थांनी दण्डीने आधीच म्हणजे भामहाच्या आसपासच्या कालांत योजिलेला आहे ( काव्यादर्श परि० २, श्लोक ३१३, ३१४ पहा. ). स्वतः भामहानेहि तो वर उद्धृत केलेल्या शेवटल्या श्लोकांत घातलेला आहे, अर्थात् या ठिकाणीं डॉ. देशमुख यांनी खरे यांच्यापासून ( चुकीचें ) ऋण घेतलें हा भाग महत्त्वाचा नसून भामहाचा अर्थ खरे सांगतात तसा नसून इतर संस्कृत आलंकारिकांच्या सारखा आहे हा आहे.

भामहाचा आधार याप्रमाणे सुटल्यावर मराठी अलंकारशास्त्राचा आधार घेणें भाग पडतें. श्री. नेने यांनी महानुभाव ग्रंथांमधून हें मराठी अलंकारशास्त्र गोळा केलेलें आहे. त्यांत "श्लेष=उपमा देऊनिया दूषिजे" असें एक वचन आहे. याचें उदाहरण म्हणून नेने यांनी ज्ञानेश्वरीच्या १२ व्या अध्यायांतील संतांच्या शुचित्वाच्या विवेचनाच्या सुप्रसिद्ध अशा चार ओंव्या उद्धृत केल्या आहेत. त्या संस्कृत अलंकारशास्त्राप्रमाणे व्यतिरेकाच्या उदाहरण होतात. ज्ञानेश्वरींत व्यतिरेकाचीं उदाहरणें असलीं तरी फार थोडीं आहेत. 'कोंदाकोंदी' म्हणण्याइतकी खासच नाहीत हें कोणासहि मान्य होईल. म्हणजे श्लेषाचा हा अर्थ ज्ञानेश्वरांस मान्य नव्हता असें झालें. श्लेष म्हणजे व्यतिरेक असें दुसऱ्या एका महानुभावाचें मत दिसतें. तें ' श्लेश भणीजेः उपमा देऊनि हेळसुनि सांडिजे ' या वचनांत व्यक्त होतें. या दोन्ही ठिकाणीं अर्थात् उपमानाची उपमा उपमेयास देऊन नंतर त्या **उपमानाचा** अपकर्ष व्यक्त करावयाचा असा अर्थ दिसतो. म्हणजे उपमेद हें श्रेष्ठ दाखवावयाचें. तिसऱ्या एका ठिकाणीं 'उपमेय तो श्लेष' असें वचन आलें आहे. उपमेय याचा येथील अर्थ पुढील-

प्रमाणे देण्यांत आला आहे. "आणि सानयाची (उपमा) थोरासि दीजे तें उपमेयः यथा चक्रवर्तीचेया स्कंधासि वृषभस्कंधाची उपमा दीजे." यांत उपमान वृषभस्कंध आहे, वृषभ नव्हे. त्याची उपमा देऊन नंतर त्यास 'दूषिजे' किंवा 'हेळसुनि सांडिजे' असा प्रकार कांही झालेला नाही. किंवा उपमेयभूत चक्रवर्तीस्कंधाबाबतहि असें कांही करावयाचें आहे असें दिसत नाही. म्हणजे मागील दोन वचनांतील अर्थाशीं या वचनाच्या अर्थाचा संबंध दिसत नाही. याचा अर्थ असा की या महानुभाव लेखकांची श्लेष शब्दाच्या अर्थाविषयी एकवाक्यता नाही.

पण यापेक्षा अधिक मौज आताच निर्दिष्ट केलेल्या लेखकाच्या लेखनाची आहे. या लेखकाच्या एका उताऱ्यावर नेने व देशमुख यांचा विशेष भर आहे. तो उतारा असा:—तेंचि सदृशत्व त्रिधा। **गुणोत्कृष्टं प्रसिद्ध यद् उपमानं तदुच्यते । तन्न्यूनं उपमेयं स्यात्, एतयोः तुल्यतोपमा॥** सानयासि थोराची उपमा दीजे तें उपमान बोलीजेः यथा मनुष्यमुखासि चंद्रोपमाः आणि सानयाची थोरासि दीजे तें उपमेयः यथा चक्रवर्तीचेया स्कंधासि वृषभस्कंधाची उपमा दीजे ॥ सदृशत्वें का समानत्वेंः तोचि उपमा बोलीजेः यथा सुवर्णः पितळः दुग्धः तक्रः वर्णसाजात्यान्वयेंः गोडियां अप्रत्यन्वयेंः यथा नेत्रासि भ्रमरोपमाः मीनोपमाः चपलार्थी; आकृत्यार्थी कमलोपमाः उपमा तें साहित्यः उपमान तें वर्णकः उपमेय तो श्लेष— (द्वात्रिंशल्लक्षणटीका.)

प्रस्तुत टीकाकाराने ज्या संस्कृत श्लोकाचा आधार घेतला आहे, त्याचा अर्थ त्यास नीट न समजल्याने त्याचें विवेचन चुकीचें झालें आहे. या श्लोकांत उपमेची व्याख्या आहे. उपमेय आणि उपमान यांची तुल्यता म्हणजे उपमा ही ती व्याख्या होय. या व्याख्येंतील उपमान आणि उपमेय यांची कल्पना प्रथमतः दिलेली आहे. जें विशिष्ट गुणांत उत्कृष्ट— श्रेष्ठ म्हणून (आधीच) प्रसिद्ध आहे त्यास उपमान म्हणतात. त्यापेक्षा (त्या गुणांत थोडें) कमी असतें तें उपमेय होय. उपमेय हें नव्यानें वर्णिलें जातें, त्यांचें त्या गुणांतील उत्कृष्टत्व अद्यापि सिद्ध अथवा सर्वमान्य व्हावयाचें असतें, म्हणून तें उपमानापेक्षां न्यून, अर्थात् थोडेसें, मानावें असा संस्कृत अलंकारशास्त्राचा संकेत आहे. या दोघांची तुल्यता वर्णिली म्हणजे उपमा होते, हा त्या श्लोकाचा अर्थ. पण टीकाकारास येथे तीन प्रकारचें सदृशत्व दिसलें, व म्हणून 'तेंचि सदृशत्व त्रिधा' असें म्हणून आपल्या आधाराला त्याने वरील श्लोक घेतला. खरोखर उपमान, उपमेय व उपमा यांची व्याख्या संस्कृतमधील या अत्यंत सरळ व सुबोध श्लोकाला करावयाची असतांना या महानुभाव टीकाकाराने उपमान म्हणजेहि एक प्रकारची उपमा, उपमेय म्हणजेहि आणखी एक प्रकारची उपमा, व उपमा म्हणजे तिसऱ्या प्रकारची उपमा असा नावीन्यपूर्ण अर्थ सांगितला; आणि सानयाची थोरासि (उपमा) असा उपमेयाचा अर्थ सांगितला. गंमत अशी की या महानुभाव टीकाकाराची ही चूकहि प्रमाण मानून श्री. नेने आणि डॉ. देशमुख यांनी उपमेयाचा कांही विशेष अर्थ सांपडला असें मानलें, व त्यांतच 'उपमेय तो श्लेष' असेंहि एक समीकरण मिळालें, तेव्हा श्लेषाचाहि कांही वेगळा अर्थ सांपडला असें मानलें. वस्तुतः 'सानयासि थोराची' किंवा 'सानयाची थोरासि' तुल्यता असा कांही प्रकारभेद मूळ संस्कृतश्लोककारास अभिप्रेत नाही. त्या त्या गुणांत तें तें उपमान हें त्या त्या उपमेयापेक्षा सापेक्षतः उत्कृष्ट असतें एवढेंच त्यास अभिमत आहे. आकृतीने वृषभस्कंध हा चक्रवर्तीस्कंधापेक्षा श्रेष्ठच मानावयास हवा. तेथे 'सानयाची थोरासि' उपमा नाही. याच टीकाकाराने सानथोर नसलेल्या अशा समान पदवीच्या दोघांतील उप-

मेस उदाहरणें दिलीं, तीं तरी मग समान पदवी कोठे दर्शवितात ? सुवर्णाची आणि पितळेची किंवा दुग्ध आणि तक्र यांची पदवी समान कशी होईल ? या प्रश्नास उत्तर म्हणूनच की काय तो टीकाकार म्हणतो: "वर्णसाजात्यान्वयें, गोडिया अप्रत्यन्वयें:" याचा अर्थ असा दिसतो की वर्णानें सुवर्ण–पितळ किंवा दूध–ताक सजातीय आहेत, पण गोडीने भिन्न आहेत. यांत सुवर्ण व पितळ यांच्या बाबत गोडीचा प्रश्न उद्भवत नाही ही बाब दुर्लक्षिली,तरी त्यामध्ये समानत्व कसें येतें ? केवळ वर्णाने तें येतें असें म्हटल्यास मुख आणि चंद्र यामध्येहि तें कां येऊं नये ? तेथे सानथोरभेद कां मानावयाचा ? यापुढे दिलेल्या दोन तीन उदाहरणांचाहि नीट अन्वय लागत नाही. नेत्रांना भ्रमरांची किंवा मीनांची उपमा चपलार्थी देतां येते हें ठीक, परंतु कमलाची उपमा आकृत्यार्थी हें शंकास्पद वाटण्याचा संभव आहे. आकारांत कमल केव्हांहि मोठें ठरेल. त्याच्या गोल आकृतीमध्ये साम्य सांपडेल असें म्हटल्यास तें भ्रमरांतहि सांपडेल, व मीनाची उपमाहि आकृत्यार्थी होणार नाही असें नाही. इतकें सारें झाल्यावर हा टीकाकार एकदम 'उपमा तें साहित्य: उपमान तें वर्णक: उपमेय तो श्लेष' असें म्हणून कांही निराळीच परिभाषा आणीत आहे. साहित्य याचा अर्थ सहितत्व असा घेतला, तरी सहितत्व म्हणजे त्यानेच तें उपमेंत असतें असें म्हटलेलें समानत्वहि नव्हे आणि सदृशत्वहि नव्हे. सारांश, प्रस्तुत टीकाकार शार्ङ्गधर पुसदेकर महानुभाव यांचें हें सारेंच विवेचन 'अरमणीय' आहे.

या चर्चेचा निष्कर्ष हा की उपरिनिर्दिष्ट महानुभाव टीकाकारांनी संस्कृत अलंकार-परिभाषा स्वेच्छपणें आणि अज्ञानाने वापरली आहे. त्यांच्या लेखनावरून मराठीचें निराळें असें अलंकारशास्त्र बनवूं पाहणें हें अयोग्य होईल. ज्ञानेश्वरांनीहि श्लेष शब्दाचा उपयोग कांही खास विशेष अर्थाने केला आहे असें नाही हा दुसरा निष्कर्ष होय. आपणहि आज 'उपमादृष्टांतांनी लेखन सजविलें आहे' इत्यादि वाक्यांत दृष्टांताचा अलंकारांतील पारिभाषिक अर्थाने उपयोग न करितां सामान्यपणें औपम्य व्यक्त होईल अशा उदाहरणांच्या अर्थाने तो शब्द योजितों, तसेंच ज्ञानेश्वरांनी केलें असावें हा दुसरा निष्कर्ष होय. तिसराहि एक निष्कर्ष निघतो, पण तो मी सांगण्यापेक्षा वाचकांनीच जाणलेला बरा.

---

कै. प्रा. लक्ष्मणशास्त्री लेले यांनी रचलेला

## एक अप्रकाशित श्लोक

[ New Times demand new measures and new men याचें रूपान्तर ]

नव्या मनुस लागती नर नवे, नवी साधनें  
जुनें कितिहि उत्तम प्रगतिला पडे तें उणें ।  
प्रबोध पसरे जनीं हलुहळू घडे उन्नति  
महोन्नति पथ स्वयें बुध पुढील ते दाविती ॥

[ श्री. म. गो. मोडक यांचेकडून ]

## साभार स्वीकार

१ अंतरंग ( कवितासंग्रह )— कवि शि. मि. पारकर; प्रका० सौ. अपर्णा पारकर, गोखले रोड ( नॉर्थ ), मुंबई २८:मूल्य एक रु.

२ आवाजकी दुनिया— ले० शुद्ध-सारंग; प्रका० विमल चित्रे, खारीबाव, बडोदें मूल्य पांच रु.

३ आदिमाया ( दीर्घकथा )—ले० प्रा. व्यं. रा. वनमाली; प्रका० पु. आ. चित्रे खारीबाव, बडोदें, मूल्य दोन रु.

४ अन्धार-उजेड ( कथासंग्रह )—ले० गो. के. भट; प्रका० विमल चित्रे, खारीबाव, बडोदें; मूल्य तीन रु.

५ विठ्ठलभाई पटेल ( चरित्र व आठवणी )— ले० ज. गं. करंदीकर; प्रका० नॅशनल इन्फर्मेशन ॲंड पब्लिकेशन्स लि, अपोलो बंदर, मुंबई. मूल्य साडेचार रु.

६ शारदिनी ( कवितासंग्रह )—कवि वा. पु. दामले; प्रका० एन्. के. पब्लिशिंग हाऊस, ६२७ बुधवार, पुणें, २; मूल्य अडीच रु.

७ स्वरनिनाद ( फिडलवादन )—ले. श्रीधर पार्सेकर; एन् के. पब्लि. हाऊस, ६२७ बुधवार, पुणें २; मूल्य दीड रु.

८ अहिंसा सम्राट (ऐतिहासिक कादं.) —ले. वा. ना. शाह; विक्रेते, परचुरे प्रका० मंदिर, मुंबई ४; मूल्य सहा रु.

९ कै. तात्यासाहेब केळकर विविध-दर्शन ( विविध अग्रलेखांचा संग्रह )—संपा० न. मो. जोशी; प्रका० हिंदप्रकाशन, आंग्रेवाडी, मुंबई ४ ; मूल्य दोन रु.

१० अभिनव रंगावली ( रांगोळीची कला )—ले. मंजुळाबाई सावंत; प्रका० मे. जोशी आणि लोखंडे; ३३५ शनिवार, पुणें २; मूल्य अडीच रु.

११ पाच संतकवी—ले० डॉ. शं. गो. तुळपुळे; विक्रेते, ल. ना. गोडबोले; बुकसेलर्स, लक्ष्मीपथ; पुणें २; मूल्य आठ रु.

१२ शुभांगी ( कादंबरी )—ले. व प्रका० भा. द; खेर, २ नारायण, पुणें २; मूल्य पाच रु.

१३ सालगुदस्त—ना. न. वि. गाडगीळ; प्रका० देशमुख आणि कं, शनिवार, पुणें २, मूल्य चार रु.

१४ उत्तरेकडील भिंती—ले. आचार्य कालेलकर; प्रका० वोरा आणि कं.लि. मुंबई २; मूल्य सव्वा रु.

१५ संगीत लोकराज्य ( नाटक )—लेखिका. सौ. उमाबाई सहस्रबुद्धे; प्र० प्रा. मा. भी सोलापूरे, जयहिंद प्रेस, कोल्हापूर मूल्य दोन रु.

१६ वेश्या आणि वेश्याव्यवसाय—ले. पु. गो. नाईक; प्रका० समाजसेवासंघ; मुंबई ४ मूल्य तीन रु.

१७ माझा प्रवास ( ५७ च्या बंडाचा इतिहास, द्वितीयावृत्ति )—ले. वे. शा. विष्णु भट गोडसे; चित्रशाळा प्रका० पुणें २; मूल्य अडीच रु.

१८ महात्मा गांधी दर्शन—ले. आपटे गुरुजी, अ. वि. गृह प्रका० पुणें २; मूल्य साडेतीन रु.

१९ हांक ( भाषणसंग्रह )—ग. त्र्यं. माडखोलकर; प्रका० देशमुख आणि कं. शनिवार, पुणें २; मूल्य साडेचार रु.

२० साहित्यसम्राट केळकर यांच्या आठवणी—संपा-संग्रा-प्रका. स.वि. बापट, केसरी कार्यालय पुणें २; मूल्य आठ रु.

२१ फुलांचें झेले ( भावगीतसंग्रह )—कवि. व प्रका० र. वि. सरवटे, जयेंद्रगंज, लष्कर ग्वाल्हेर; मूल्य दोन रु.

# परिषद्वार्ता

( चिटणिसांकडून )

**भेट व सत्कार**—हिंदुस्थान सरकारचे वीज, खाणी व बांधकाम खात्याचे मंत्री नामदार श्री. न. वि. गाडगीळ यांनी शुक्रवार दि. ८-१०-४८ रोजीं परिषदेस भेट दिली. परिषदेच्या वतीने त्यांचा सत्कार करण्यांत आला.

**स्मृतिदिन**—कै. न. चिं. उर्फ तात्यासाहेब केळकर यांच्या प्रथम स्मृतिदिनानिमित्त शुक्रवार दि. १५-१०-४८ रोजीं सायंकाळीं ६ वाजतां मा. प. साहित्य मंदिरांत डॉ. वि. पां. दांडेकर यांचें 'केळकरांच्या साहित्यविषयक कल्पना' या विषयावर व्याख्यान झालें.

**दुखवटासभा**—शनिवार दि. २३।१०।४८ रोजीं सुप्रसिद्ध विनोदी नाटककार कै. माधवराव जोशी यांच्या निधनानिमित्त झालेल्या दुखवटा सभेंत परिषदेने भाग घेतला.

**कै. डॉ. माधवराव पटवर्धनस्मृतिदिन**—सोमवार दि. २९।११।४८ रोजीं सायंकाळीं ६। वाजतां कै. डॉ. माधवराव पटवर्धन स्मृतिदिनानिमित्त प्रा. म. ना. अद्वंत यांचें 'गेल्या वर्षातील मराठी काव्य' या विषयावर प्रा. अनंत काणेकर यांच्या अध्यक्षतेखाली व्याख्यान झालें.

**वार्षिक वाङ्मयसमालोचक व्याख्यानसत्र**—खालील व्याख्यात्यांचीं नांवापुढें दिलेल्या विषयांवर समालोचनात्मक व्याख्यानें झालीं. प्रा. वि. बा. आंबेकर (चरित्र) श्री. ग. ह. खरे (इतिहास) श्री. गोपीनाथ तळवलकर (लघुकथा) प्रा. रा. शं. वाळिंबे (टीका) प्रा. गं भा. निरंतर (कादंबरी) प्रा. म. वि. फाटक (नाटक). इतिहास या विषयावरील व्याख्यानप्रसंगीं श्री. य. रा. गुते व नाटक-समालोचनप्रसंगीं मामासाहेब वरेरकर यांनी अध्यक्षस्थान स्वीकारलें होतें.

---

## साभार स्वीकार—

**२२ पुष्पांजलि**—( टीकालेख )—प्रा. द. सी. पंगु; विक्रेते भारत बुकस्टॉल, पॅलेस रोड, कोल्हापूर; मूल्य साडेतीन रु.

**२३ चिपळूणचीं स्मृतिचित्रें**—अनु. व प्रका० वि. द. साठे, ३१७ सदाशिव पेठ, पुणें २; मूल्य तीन रु.

**२४ टिपरी पडघमवर पडली** ( कादंबरी )—ले. मनमोहन नातू; प्रका० दि डेक्कन पब्लिशर्स; २७ बुधवार, पुणें २; मूल्य पाच रु.

**२५ तर्पण**—( धार्मिक विषयांवरील संशोधनात्मक प्रबंध ) ले. व प्रका० ना. गो. चापेकर; टिळक रस्ता, पुणें २; मूल्य तीन रु.

**२६ पावित्र्यविडंबनाचा वाद** -ले. व प्रका० प्रा. ग. वा. कवीश्वर, होळकर कॉलेज, इंदूर; मूल्य अडीच रु.

**२७ शुद्ध भक्तिपंथाचा इतिहास** ( अर्थात प्रार्थनासमाज परिचय )— संपा. वा. अ. गरुड; प्रका० य. गो. जोशी, सदाशिव, पुणें २; मूल्य आठ आणे.

**२८ गोत्रविचार**—ले. व प्रका० ग. रा. परांजपे, १२८ बुधवार, पुणें २, मूल्य बारा आणे.

**नियामक मंडळ**—परिषदेच्या नियामक मंडळाची सभा रविवार दि. २८।११।४८ रोजीं अध्यक्ष प्रा. न. र. फाटक यांच्या अध्यक्षतेखाली मा. प. साहित्य मंदिरांत दुपारीं ४ वाजतां भरली. सुरवातीस पुढील साहित्यिक व साहित्यप्रेमी मंडळींच्या निधनानिमित्त दुखवटा व्यक्त करण्यांत आला. कै. प्रा. चिं. वि. जोशी, कै. के. ल. ओगले, कै. श्री. ना. कर्नाटकी कै. प्रज्ञानेश्वर यति, कै. सर रघुनाथराव सबनीस, कै. माधवराव जोशी, महंत दत्तमहाराज. महाराष्ट्र साहित्य संमेलनाचे अध्यक्ष नाट्याचार्य कृष्णाजी प्रभाकर खाडिलकर यांच्या निधनानिमित्त दुखवट्याचा स्वतंत्र ठराव करण्यांत आला. पुणें नगर वाचन मंदिराकडून महाराष्ट्र साहित्य संमेलनाचें आलेलें निमंत्रण स्वीकारण्यांत आलें. संमेलनासंबंधी सर्व व्यवस्था करण्याचें अधिकार कार्यकारी मंडळास देण्यांत आले. संमेलन मे महिन्यात पुणें येथे भरण्याचें निश्चित झालें. कै. वा. गो. आपटे ट्रस्टकडून संदर्भ ग्रंथ संग्रहासाठीं आलेल्या रुपये दहा हजाराच्या उदार देणगीचा सभेने कृतज्ञतापूर्वक स्वीकार केला आहे. कै. विष्णुशास्त्री चिपळूणकर स्मारकाच्या योजनेस व नकाशास सभेने संमति दिली.

**कार्यकारी मंडळ**—कार्यकारी मंडळाची सभा रविवार दि.२६।९।४८ रोजी भरून त्रैवार्षिक निवडणूकीसंबंधी योजना ठरविण्यांत आली.

**परीक्षा**—महाराष्ट्रांत व बृहन्महाराष्ट्रांत यावर्षी चौऱ्यांशी केंद्रांत परीक्षा झाल्या. सर्व परीक्षांस मिळून तेवीसशें उमेदवार होते.

**परीक्षावर्ग**— परिषदेतर्फे प्राज्ञ व विशारद वर्ग नियमितपणें चालू होते. या वर्गातील विविध विषयांचे अध्यापन प्रा. श्री. म. माटे, प्रा. वा. दा. गोखले, प्रा. गं. भा. निरंतर, डॉ. न. का. घारपुरे, प्रा. रा. शं. वाळिंबे, प्रा. श्री. के. क्षीरसागर, श्री. गोपीनाथ तळवलकर, प्रा. चंद्रकुमार डांगे, प्रा. दु. का. संत व श्री. ह. श्री. शेणोलीकर यांनी मोठ्या आत्मीयतेनें केलें. परिषद् त्याबद्दल त्यांची ऋणी आहे.

---

## उदार देणगी

परिषदेने स्वीकृत केलेल्या अनेक योजनांपैकी ग्रंथ संग्रहालय ही एक योजना आहे. मराठी भाषेची सेवा करण्याच्या हेतूनें स्थापन झालेल्या संस्थेकडे आजपर्यंत स्वतःचा ग्रंथसंग्रह नव्हता व ही उणीव चालकांना जाणवत होती. चालकांच्या विनंतीवरून कित्येक सभासदांनी व प्रकाशकांनी आपलीं पुस्तकें या कामासाठीं दिलीं व हें कार्य सुरू झालें. परिषदेचे कार्याध्यक्ष प्रा. माटे व परिषदेचे एक निष्ठावान् कार्यकर्ते श्री. गोपीनाथपंत तळवलकर यांनी आनंदकर्ते कै. वा. गो. आपटे इस्टेट ट्रस्टकडे अर्ज पाठवून मदतीबद्दल विनंती केली. ट्रस्टचे सभासद श्री. सहस्रबुद्धे, श्री. पुराणिक व श्री. आप्पासाहेब जोशी यांना परिषदेची योजना पसंत पडली व विशेषत: श्री. आप्पासाहेब जोशी यांच्या प्रयत्नाने ट्रस्टकडून दहाहजार रुपयांची उदार व घवघवीत देणगी परिषदेला मिळाली. या देणगींतून परिषदेनें ' कै. वा. गो. आपटे संदर्भग्रंथसंग्रह ' उभारावयाचा आहे. परिषदेला अलिकडे मिळालेल्या देणगींत ही देणगी सर्वांत मोठी असल्यामुळे सध्याचे ' आनंद संचालक ' श्री आप्पासाहेब जोशी व इतर विश्वस्त यांनी परिषदेला मोठ्या प्रमाणांत उपकृत केलें आहे.

अनुक्रमणिका

# — परीक्षणें —

**मोत्यांचा चारा--**

[ ले० ग. ल. ठोकळ, प्र० दयार्णव कोपर्डेकर ५५९ सदाशिव, पुणे २. किंमत सव्वादोन रुपये. ]

महाराष्ट्राच्या लघुकथालेखकांच्या नव्या पिढींतले एक नामवंत लेखक श्री. ठोकळ यांचा हा नवा कथासंग्रह. यांत एकूण सहा कथा आहेत. श्री. ठोकळ हे आजचे लोकप्रिय लेखक, वाचकांच्याहि त्यांचेकडून कांही अपेक्षा, अशी स्थिति आहे. विशेषतः जानपद जीवनाचा ऐन गाभा रंगवावा ठोकळांनी, असें वाचकांना वाटतें. जिवंत शब्दांचे पैंजण घातलेली झोकदार भाषा, कल्पनाशक्तीला झोके देणारे कथाप्रसंग, व मोठीं रसाळ खुमासदार वर्णनें हे ठोकळांचे विशेष गुण होत. हे गुण प्रस्तुत कथासंग्रहांत बऱ्याच प्रमाणांत आढळतात. "त्रिकोणी तंत्रकथां"पेक्षा येथे कांही वेगळें पाणी चाखावयास मिळतें. प्रेम असलें तरी त्यांत एकप्रकारचा धीट मनमोकळेपणा लेखक रंगवितात. तसेंच वातावरणांत देखील कोहीमाचा डोंगर, कलकत्याचे मिलिटरी हॉस्पिटल; छत्तीसगड सारखें संस्थान; त्रिनठाव असलेला डोह अशासारखी विविधता असल्यामुळे कथांचा वेगळेपणा उठून दिसतो. कथेंत एखादें रहस्य गोंवण्याची व कथेचा शेवट नाट्यपूर्ण करण्याची हातोटी साधल्यामुळे लेखकाने या संग्रहांतील बहुतेक कथा आकर्षक केल्या आहेत.

—मात्र कथावाचनाच्या समाप्तीनंतर मनावर उमटलेल्या संस्काराचे पृथक्करण केलें, तर सर्वच वेळीं, कांही विशेष हातीं लागतें असें नाही. 'ग्यानबाची मेख' ही २२ पानी कथा वाचल्यानंतर नेमका ठसा मनावर कोणता उमटतो? या कथेंत तीन गांवगुंड ग्यानबाला जगांतून उठविण्याचा यत्न करतात व शेवटीं त्या तिघांच्या हातांत बेड्या पडतात हा विषय मोठा रंगवून सांगितला आहे. पण या रंगविण्याच्या भरांत रंगभरणी फारच भडक झाली आहे. "ग्यानबाच्या बापाच्या प्रेताचा अंगठा कापून आणून तो एक लाखाच्या स्टँपवर उठावेणें" ही घटना या गोष्टींत प्राणभूत आहे. पण ही घटना वाङ्मयमूल्यांच्या दृष्टीनें 'अवास्तव' आहे. यामुळें इतर वाङ्मयगुण असूनहि या कथेला जवळजवळ रहस्यकथेचें रूप प्राप्त झालें आहे. जनपदाचें अंतःकरण जाणणारे श्री ठोकळासारखे फार थोडे लेखक मराठींत आहेत, तेव्हां त्यांनी यापेक्षा अधिक सखोल रीतीने जनपदसृष्टि मराठी वाङ्मयांत आणावी असेंच कोणीहि म्हणेल. "मोत्यांचा चारा" मधील 'गोड्या पाण्यांत नदीच्या डोहांत मोती सापडतात' ही घटनाहि वरील दृष्टीने तपासून पाहाण्यासारखी आहे 'तसबीर' मधील दिवाणजी संस्थानिकाच्या तसबीरीच्या आंत दडवून पांच लाखाच्या नोटा आणतात. 'दिवाणजी जशास तसें वागले' यापेक्षा खोल संस्कार मनावर उमटत नाही. "प्रेम आणि मरण" ही कथा मात्र सर्वच दृष्टींनी अप्रतिम उतरली आहे. एखाद्या रंगीत बोलपटाप्रमाणें अडीच हजार वर्षांपूर्वीचे तें शैलारण्यांतलें अद्भुतरम्य वातावरण श्री ठोकळांनी मनमोहक वठविलें आहे खरें! फळें, मध व गाईचें दूध एवढाच आहार घेणारी ती शैलारण्यांतील 'क्लिओपात्रा'—

कनकलता, तिची दिनचर्या, तो पहिल्याच भेटींत 'प्रीतीची पूजा' बाणाने धाडणारा अभय, शेवटीं प्रेयसीने प्रियकराला करावयास लावलेलें विषपान, सारेच प्रसंग व व्यक्ति आपल्या मनावर विशेष परिणाम करतात. विशेषतः शेवटच्या प्रसंगांतील नाटय आणि सूचकता बहारदार आहे. कर्तव्यापुढे प्रेमाचा किंचितहि टिकाव लागला नाही हें दर्शवितांना लेखकाने पुढील तीनच धारदार वाक्यें लिहिलीं आहेत. "राणीच्या डोक्यांत लख्ख प्रकाश पडला. विजेच्या लाख ठिणग्यांनी तिच्या डोळ्यांत एकदम पेट घेतला. तीक्ष्ण दातांनी तिनें आपला बिंबाधर रक्त निघेपर्यंत चावला." या गोष्टींतील सर्व वर्णनें अत्यंत काव्य-मय व तो तो प्रसंग वा स्थळ हुबेहूब डोळ्यांपुढें उभीं करणारीं म्हणून उल्लेखनीय आहेत. सूर्याचीं सोनेरी किरणें कलू लागलीं. वाऱ्याची पेंग ओसरली. झुळुकाझुळकांनी नदीच्या पाण्यावर इवलाल्या खळ्या पडूं लागल्या. राजधानींतले सौध दुरून दिसूं लागले. तीरावरल्या वालुकेचा वैराण पसारा मागे राहिला;" "तिची अंगकांति ! ती पाहून केवड्याच्या पातीवर मोत्यांचें पाणी चढवलें आहे की, रसरशीत लिंबावर पारिजातकाचे देठ चुरडले आहेत असा भ्रम होई" यासारखीं हवीं तेवढीं वाक्यें उदाहरणादाखल पुढें करितां येतील. श्री. ठोकळांचें 'काव्य' कथेंतहि त्यांना सोडत नाही ! 'प्रेम आणि मरण' प्रमाणेच इतरहि गोष्टीं-तील हृदयाचा ठाव घेणारीं वर्णनें हा या "मोत्याच्या चाऱ्यांतील" चविष्ट घास आहे.

असाच दुसरा चविष्ट घास म्हणजे ठोकळांचे मोत्यासारखे शब्द. नागर व ग्रामीण या उभय भाषांतील वेंचक धन एकत्र करून त्यांची केलेली ही वाक्यरास पाहिली कीं खरें मराठी मातेचें स्तन्य प्यालेला हा लेखक आहे याची मनोमन खूण पटते. या धनाचा यथायोग्य उपयोग करून जनमनाचा जिता जिव्हाळा अधिक वास्तवदर्शी पद्धतीने श्री. ठोकळ रंगवितील तर त्यांच्या कथामौक्तिकांचे पाणी "गुल्बशीच्या डोहांतील मोत्यापेक्षां" अधिक गुलाबी होईल असें प्रामाणिकपणें वाटतें !

—(प्रा.) वि. म. कुलकर्णी.

**अन्नदाता उपाशी—**

[ ले०—वि. वा. हडप; आदर्श वाङ्मय-प्रकाशन; मूल्य अडीच रु. ]

—ही वि. वा. हडप यांनी कोंकणच्या पार्श्वभूमीवर लिहिलेली शेतकरी जविनाची करुण कहाणी आहे. 'धरणीकंप' या नांवाने ही कादंबरी आराखड्याच्या रूपांत पूर्वी प्रसिद्ध झालेली होती. त्यालाच व्यवस्थित व तंत्रशुद्ध स्वरूप देऊन त्यांनी ह्या कादंबरीची पुनर्रचना केली आहे.

या कादंबरींतील मध्यवर्ती घटना वास्तव आहे असें लेखकांने प्रस्तावनेंत सांगितलें आहे. जमीनमोजणीच्या भानगडी, त्याची सरकारदरबारीं चलाखीने झालेली शाबिती, या कबुलायतीच्या जोरावर जमीनदारांनी आपल्या शेतकरी कुळांचा केलेला अमानुष छळ व त्या छळांचें एका जमीनदाराच्या खुनांत झालेलें भीषण पर्यवसान, या साऱ्या घटना सत्यसृष्टींत घडलेल्या आहेत. पण या घटनांची गुंफण करतांना कोंकणांतील शेतकरी जीवनाचें जें चित्र लेखकाने आपणापुढे उभें केलें आहे त्यांतच लेखकाचें खरें कौशल्य दिसून येतें. कोंकणांतील जीवनाचें अतिशय सूक्ष्म निरीक्षण आपणाला या कादंबरींत दिसून येते. विशेषतः तेथील जमीनदार-जमीनदारांमधील भांडणें, त्यांचे वतनाबाबत चाललेले दावे, खंडकऱ्यांविरुद्ध त्यांचीं होणारीं कारस्थानें, खंडकऱ्यांत फूट पाडून आपलें कार्य साधून

घेण्याचें जमीनदारांचें चातुर्य व खंडकऱ्यांची अगतिकता व भोळेपणा या सर्वांचें चित्रण लेखकाने मोठ्या प्रभावी रीतीने केलें आहे. कोकणांतील रत्नागिरीजवळच असलेल्या मिरजोळी या खेडेगांवांत कथानकाची उभारणी केली आहे. रघुनाथ, रामराव, जमना व बाबा देसाई ही या कादंबरींतील प्रमुख पात्रें. रामरावाच्या पूर्वजाने बाबा देसायाच्या पूर्व-जापासून एक अत्यंत पडिक जमीन खंडाने घेतली होती व आपल्या कष्टाने-प्रयत्नाने त्या जमीनींतून सोनें काढून दाखविलें होतें. वृंदावन हें त्या जमीनीचें नांव. पण पुढें बाबा देसायाच्या ताब्यांत सत्ता आल्यावर त्यांनी अरेरावी गाजविण्यास सुरवात केली—व्यक्तिगत अपमानाचा मोबदला घेण्यासाठी रामराव व त्यांचा मुलगा रघुनाथ या दोघांना जमीनीच्या खंडाबाबत विविध रीतीने छळावयास सुरवात केली व अक्षरशः त्या सुखी कुटुंबाला अन्नाला मोताद केलें. रघुनाथची पत्नी जमना हिच्यावर पापी दृष्टि ठेवण्यासहि त्याने कमी केलें नाही. त्याचें पर्यवसान शेवटीं रघुनाथच्या कुटुंबाचा नाश होण्यांत झालाच पण शेवटीं बाबा देसायाचा या चिडलेल्या कुळाकडून अमानुषपणें खून झाला.

या कथानकाच्या सांगाड्यांत त्यांनी कितीतरी आणखी जिवंत व वास्तव व्यक्तिचित्रें व नाट्यपूर्ण घटना भरलेल्या आहेत. विशेषतः बाबा देसायाने ठेवलेल्या भाविणीचा भाऊ गंगाराम पाटील याची अरेरावी, मोठेपणा मिळवूं इच्छिणाऱ्या दाजीबा व हारिबा यांची कारस्थानें, रघुनाथाला तुरुंगांत अडकविण्यासाठी बाबा देसायांनी केलेल्या लटपटी इत्यादि अनेक गोष्टी कथानकाची उत्कटता वाढवितात. त्यामुळे कादंबरी पहिल्यापासून शेवटपर्यंत वाचनीय झाली आहे.

मात्र एक दोन गोष्टींचा उल्लेख अवश्य केला पाहिजे. कथानक वास्तव असलें व त्यांतील स्वभावचित्रांचें वर्णनहि वास्तव असलें तरी एकंदर कथानकाची गुंफण ही अधिक आकर्षक करतां आली असती. निरनिराळे समरप्रसंग उत्कटत्वाने रंगवून त्यांच्या पार्श्वभूमीवर बाबा देसायाच्या खुनाचा प्रसंग रंगविला असता तर त्याचा परिणाम अधिक उत्कट झाला असता. पण पुष्कळ ठिकाणीं आपल्या आवडत्या वर्गीय कलहाच्या वादाविवादाच्या भरांत रघुनाथ, जमना किंवा रामराव यांच्या मनांतील भावनांच्या कल्लोळांचें चित्र परिणामकारक रीतीने केलें गेलें नाही. त्यामुळे शंकरच्या मृत्यूचा, रामरावांच्या मृत्यूचा किंवा रघुनाथला फाशीची शिक्षा झाल्याचा प्रसंग—हे सारे प्रसंग अनुत्कट वाटतात. शेवट तर अगदी घाईघाईने केल्याचा भास होतो. कथानकाच्या मध्यें आणलेल्या दत्तू व मधूच्या उपकथा-नकाचें चित्रणहि सामान्यच झालें आहे.

पण हे दोष मान्य करूनहि कोंकणच्या शेतकरीवर्गाच्या जीवनाचें करुण चित्र या कादंबरींत अतिशय चांगल्या रीतीने रंगविलें आहे—लेखकाच्या निरीक्षण शक्तीचा व प्रभावी वर्णनशैलीचा प्रत्यय आपणास प्रत्येक पानांतून येतो व वास्तववादी लेखनाचें एक सुंदर उदाहरण म्हणूनच या कादंबरीकडे बोट दाखवावेंसें वाटतें.

श्री. हडप यांनी अनेक रशियन कादंबऱ्यांचे अनुवाद करून मराठी वाङ्मयांत मोलाची भर घातली आहेच; पण आजच्या मध्यम वर्गाच्या वैवाहिक जीवनाच्या व तरुणतरुणीच्या प्रेमाच्या त्याच—त्या अतिरंजित व क्वचित् अवास्तव वर्णनांनी भरलेल्या कादंबरीच्या जमान्यांत ह्या कादंबरीसारखी वास्तववादी कादंबऱ्यांची भर निःसंशय स्वागतार्ह ठरेल.

—(प्रा.) म. ना. अदवंत.

दूधसागर--

[ ले० बा. भ. बोरकर, प्रका० केशव भिकाजी ढवळे, मुंबई ४.
किंमत पावणेदोन रुपये. ]

दहा वर्षांपूर्वींचा ' जीवनसंगीत ' हा कवितासंग्रह कविवर्य भास्करराव तांबे यांना अर्पण करून प्रस्तावनेंत " कविवर्य तांब्यांच्या घराण्याची गायकी पुढे चालविण्याच्या निष्ठेनें मी कलेच्या उपासनेला लागलों " असें श्री. बोरकर यांनी म्हटलें. या दहा वर्षांत ती निष्ठा विशेष मावळलेली नाही. या संग्रहांतहि कित्येक चरणांत तांब्यांचे पडसाद ऐकूं येतात, अनेक कवितांचें वळण आणि रचनेचा घाट मूळ घराण्याचें नांव सांगतात. पण बोरकर हे केवळ तांब्यांची गोमंतकी आवृत्ति नव्हेत आपला स्वतःचा असा निराळा साज त्यांनी गुरूकडून मिळालेल्या गायकीवर चढवला आहे. हा साज बराचसा गोमंतकाचा आहे. आणि तोहि केवळ प्रादेशिक बोलीच्या उपयोगापुरता नाहीं. गांवठळ शब्द वेठीला धरून ' ग्रामीण कविता ' बनविणाऱ्या कवींच्या करामतीहून बोरकरांत कांहीतरी अधिक करामत आहे. त्यांची कविताच गोमंतकाने भारलेली आहे. या संग्रहाच्या प्रस्तावनेंत श्री. काका कालेलकर यांनी "गोव्याचें वैशिष्ट्य मला सांपडलें तें तरुण कवि बोरकरमध्ये" असें म्हटलें आहे. " जीवनसमृद्धि " हें तें वैशिष्ट्य. पण ही वृत्ति गोव्यापुरती मर्यादित आहे, असें कसें म्हणतां येईल ? बोरकर हे गोव्याचे कवि अशा अर्थानें कीं तेथील सुखासीन सौंदर्यासक्ति त्यांच्यांत पुरी मुरलेली आहे. मुख्यतः राजकीय कारणांमुळे बाहेरच्या जगापासून अलग राहिलेल्या या प्रदेशावर कालपर्यंत कसली तरी सुस्ती होती, म्हणून त्याची सौंदर्यदृष्टीहि भोगपरायण झाली. बाहेरच्या वाऱ्यावादळापासून कृत्रिम परिस्थितीनें आणि, जणूं कांहीं, अकृत्रिम निसर्गसौंदर्यानें निवारा प्राप्त करून दिल्यावर वेदनांची तीव्रता उतरली; आणि तृप्तीची हुळहुळच उरली. ' कळा ज्या लागल्या जीवां ' त्या नाजुक असल्या तरी सूक्ष्म आणि विदारक नाहीत; कोणालाहि जाणवतील अशा सुखलालस आहेत. यांतील बहुतेक कविता म्हणजे भोगांची शब्दस्वप्नें आहेत. रेशमी भाषा, चित्रप्राय वर्णनें, आणि नादमधुरता यांतून स्वप्नांचें वातावरण झरतें. त्या तलम आवरणाआडून भोगाची दाहकता कमी होते आणि प्रस्तावनाकार काका कालेलकर ज्याला 'आभिजात्य' म्हणतात तें येतें. विशेषतः गोंडस संस्कृत शब्दांनी भोगावर नागर शिष्टतेचें आच्छादन पडतें. ही कविता अधिक स्पष्ट असती तर हे स्वप्नगुण अनाठायीं ठरले असते. या अस्पष्टतेंतच-तिला हवें तर संयम म्हणा-तिचें वैभव आणि वैशिष्ट्य आहे, तिच्यांतील नवयौवनशीलता आहे. मात्र नवयौवनाची हुरहुर कमी, कारण ही बहुतेक प्रीतीच्या सफलतेचीं गाणीं आहेत. अजूनहि बोरकर ही वृत्ति टिकवून आहेत हें एका परीने त्यांना समाधान वाटण्यासारखें आहे. पण त्यांतच अडकून पडणें, एकाच बिंदूभोंवती रुंजी घालणें म्हणजे विकास थांबला अशी शंका येते. कविबाबत विकासाची भाषा जपून वापरावी, कारण टीकाकारांच्या तात्त्विक आखणीची तमा न बाळगतां आपल्या काव्यप्रकृतीशीं त्याने इमान राखणें अवश्य आहे; व बोरकरांची हीच काव्यप्रकृति आहे. पण हेंहि पूर्ण सत्य नव्हे. दूधसागरांतील कांहीं तुषारांत नव्या जाणीवा आहेत; अगदीं वासापुरत्या आहेत असें कोणी म्हणो, पण या जाणीवा हळूं हळूं जाग येऊं लागलेल्या गोव्याच्या आहेत. कडेकोट आसरा भेदूनहि भोंवातलच्या उठावांचा कांही अंश आंत शिरला; आणि गोव्याच्या समाधानी आणि समरशून्य जीवनांत त्यानें खळबळ उडवली. जुन्यानव्याचा वाद तेथें आतां आला-" आग लावुनी आरम-

सुखाला घुमसत ठेव विषाद " ही कवीची प्रभूला नवीन ' साद ' आहे. ' रसलंपट ' आत्मकेंद्रितता सोडून "आजवरी घरिं जगत पाहिलें, यापुढती घर जगतीं' या वृत्तीकडे कल जात आहे. 'दुखणाईत दिव्या'च्या प्रकाशांत कोणा दरिद्री 'माउलीच्या मुखावर वाचूं ये संदेश नवा ' असें वाटूं लागलें. या बहुतेक कविता अलीकडील आहेत. पण त्याचाहि आवेश मर्यादित आहे. बोरकर 'शांतीचा जयजयकार' करतात. त्यांच्या ढगांवरील कविता या समृद्धीच्या, सौंदर्याच्या (' नवथर रसरंग गहन ') कविता आहेत.

गडद निळे गडद निळे जलद भरुनि आले
शीतलतनु चपलचरण अनिलगण निघाले

या एका ध्रुपदावरून त्यांच्या नाजुक आणि सुंदर ढगांची कल्पना यावी. विजा आणि वादळ यांचा अन्य कवींसाठीं पुरवठा करणारे कडक ढग निराळे ! १९४४ सालचें बोरकराचे गाणें या दृष्टीनें लक्षणीय आहे.

अशांतिचें गाणें आतां जीवनांत यापुढें
गात रहा व्यथितांसंगें पिळवटून आंतडें

या अशांत ध्रुपदानंतर चहूंकडून ज्वाळा उठून 'हिमगृह सगळें वितळुनी धुळीला' मिळालें, जीवन-कलह सुरू झाला आहे,

शांति कालची ती होती विश्वविस्मृतीची
आजची अशांती आहे आत्मजागृतीची

अशी नव्या परिस्थितीची तीव्र जाणीव आहे; पण शेवटच्या कडव्यांत मात्र जुनाच कोमल उतारा उगाळला आहे:

स्पर्शकंप भरुनी त्याचा तूं असेंच गावें
मधुर अति आलापांनी जग निनादवावें
वृष्टि अमृताची होइल त्याचिया प्रभावें
विझुनि दाह जाइल सारा, निस्तरेल मांकडें.

पण हा कोमलपणा बोरकरांच्या काव्यप्रकृतीचा स्थायीभाव आहे; क्षणभर खळबळ उठली तरी तिचा निरास या कोमलतेंतच होणार. बाहेरील कठोर तांडव पाहिल्यावर कवि विषादाचा सुस्कारा सोडतो आणि पुनश्च आपल्या सुरेल, सुगंधी आणि उबदार कोषांत स्वतःला गुरफटून घेतो.

बोरकरांची खरी कविता त्या परिमित आणि धुंद जगांतील आहे.

आलें जग जरि मागुनि सजणी
आपण उतरूं सागरभुवनीं

जणूं संगीताच्या परवलीनें त्या यक्षसृष्टीची कवाडें खुलतात. आदर्श कवितेला ' स्वरसुंदर ' हें विशेषण बोरकर उगाच लावीत नाहींत. सहज कोठलेंहि पान उघडलें तरी ओळीओळींत नादाची ओढ आढळेल. अनुप्रासासारख्या लालित्यासाठीं संस्कृत शब्द आणि समास यांचा स्वैर उपयोग आहे. पण गोव्याचा स्पर्शहि भाषेला वारंवार होतो. या संमिश्र, आणि विसंवादी, शब्दकलेंतून कधी एखादा गंगाजमनी संस्कृत-मराठी जोड-शब्दहि निघतो नादलोभामुळें या बहुतेक कविता गीताच्या वर्गांत येतात; कांही वेळां आशय आणि नादांकित रचना यांच्या ओढाताणींत कवीचा कौल रचनेच्या बाजूनें पडतो; पण कांहीं वेळां आशयाच्या गाभाऱ्यांतून नाद निघावा इतकी त्यांची समरसता झालेली असते.

'विश्वामित्रास' या कवितेंत बोरकर "पतनाचि तवगा अमुचें वैभव" कारण "मानव अंतीं राहिल मानव" असें म्हणतात. सुखतृष्णा ही माणुसपणाची साक्ष आहे, म्हणून तिचा कृत्रिम निग्रह अथवा संभावित 'उदात्तीकरण' त्यांना मान्य नाहीं. रससाधनेसाठीं पंचेंद्रियांचें आवाहन करणाऱ्या या कवींत स्पर्शाचा महिमा सर्वांत अधिक. त्यांच्या रूपकांचा नीट छडा लावला तर त्यांपैकीं बहुसंख्य रूपकें स्पर्शाच्या संवेदनांतून निघाल्याचीं दिसतील. पाहतांच बोरकरांची म्हणून ठांसून सांगतां येईल अशा एका कवितेचें नांवच ' स्पर्श' असें आहे. वानगीदाखल तिचा आरंभ—

फुलल्या लाख कळया
स्पर्शसुगंधा घन अंधारीं फुटल्या ग उकळया—

आणि शेवट—

द्रवलीं नयनें, स्रवलीं हृदयें
दो चंद्रांच्या संगम-उदयें
दुणी पौर्णिमा, रसा न सीमा, उसळ्यांवर उसळ्या.

पेर्ते व्हा—

( आत्माराम रावजी देशपांडे, ' अनिल '; प्रका० केशव भिकाजी ढवळे, मुंबई; मूल्य चार रुपये. )

या पुस्तकाचें नांव, त्याच्या मुखपृष्ठावरील चित्र, किंबहुना पुस्तकाचा आकार आणि आंतील छपाईसाठीं वापरलेल्या शाईचा रंग या सर्वांतच जो वेगळेपणा आहे त्याची सांगड काव्यवाचकाच्या मनांत अनिलांच्या काव्यप्रकृतीशीच पडलेली असते. वीस वर्षांपूर्वीच्या ढोबळ प्रेमगीतांच्या मोसमांत त्यांनी अतिशय नाजुक प्रेमगीतें लिहिलीं. तीं इतकीं सूचक आणि उत्कट होतीं कीं सोप्या प्रेमाला चटावेलल्या वाचकांनी —आणि टीकाकारांनी— कवीवर गूढवादाचा आरोप केला. पुढें, अनिलांनीं मुक्तछंदांतील रचनेस आरंभ केल्यावर, हा दुरावा जणूं वाढीस लागला. १९३५ सालीं प्रतिभेच्या विशेषांकांत प्रसिद्ध झालेली—आणि आतां या संग्रहांत आलेली—'प्रेम आणि जीवन' ही मुक्तछन्दांतील कविता कांहीं दृष्टींनी क्रांतिकारक होती; पण त्यावेळीं अनेकांना तिच्यांतील 'प्रेम' पटलें तरी तें कवीनें एखाद्या रूढ छंदप्रकारांत बसवलें नाहीं याचें दुःख झालें. या छंदांतील बंडखोरीनें वादाची वावटळ उठली; 'भग्नमूर्तीनें ( १९४० ) ती अधिक चेकाळली—आणि पुढें, आपोआप थंड झाली. मुक्तछन्दाच्या विरोधकांपैकीं जे परंपरावादी होते त्यांपैकीं बहुतेकांनी त्यांतील 'परंपरा' ओळखली, आणि जे केवळ वावदूक होते ते थकले— आणि दुसऱ्या एखाद्या नव्या गोष्टीच्या पाठीं लागले. १९४२ मध्ये प्रसिद्ध झालेल्या 'निर्वासित चिनी मुलास' या दीर्घ कवितेकडे महाराष्ट्राचें अनेक कारणांमुळे दुर्लक्ष झालें. आतां कवीचा 'पेर्ते व्हा' हा संग्रह प्रसिद्ध होत आहे. त्यांत मुक्तछन्दाबरोबर गीतेंहि आहेत, व या द्विविध प्रकारांमागील कवीच्या द्विविध वृत्तीचें एकत्र दर्शन आहे.

या द्विविधतेची व्याख्या भावनेसाठीं गीत—म्हणजे बद्धछंद—आणि विचारासाठीं मुक्तछंद अशी वारंवार केली जाते. पण भावना आणि विचार ही काव्यप्रांतांतील रैवर काळणी सोयीची वाटली तरी हिताची नाही. विचाराला भावनेचें पाणी हवें अथवा

भावनेला विचाराची बैठक हवी असें म्हणा, पण दोहोंचा एकजीवपणा आवश्यक आहे. नाहीं तर लिखलिखित भावगीतें अथवा पद्यमय तर्ककर्कशता हातीं पडावयाची. म्हणून तारतम्यानेंच तो भेद मानावयाचा. अनिलांच्या काव्यांत, विशेषतः या संग्रहांत, हा मेळ डोळ्यांत भरतो. 'प्रेम आणि जीवन' या कवितेवर एखाद्या विचारप्रणालीचा ठाम शिक्का मारल्यास त्यातील प्रेमभावनेची नाजुक कुसर दुखावल्याशिवाय राहणार नाहीं. 'सुप्त ज्वाला-मुखी' अथवा 'धडकी' या मुक्तछंदांची मोडतोड करून त्यांचे पुरोगामी अग्रलेख करण्यापली-कडे त्यांत कांहीतरी अधिक आहे. 'विशेष' या मुक्तछन्दाची उघडउघड वैयक्तिक भूमिका आहे. उलट, 'झळ' अथवा 'शांततेचें पुनरागमन' या गीतांमागें विचारांचा केवढा प्रखरपणा आहे.

'फुलवात' ते 'पेर्तेव्हा' या काळांतील कविप्रतिभेचा विकास या दृष्टीने महत्त्वाचा आहे. त्या पहिल्या प्रेमगीतांत यौवन-विशिष्ट आत्मकेंद्रितता होती. पण कवि तिच्यांतच गुंतून राहिला नाहीं. बाहेरच्या वाऱ्यानें अनुभूतीला अधिकाधिक विशालता आली, आणि प्रेमाची कक्षा विस्तारली. 'भग्नमूर्ति' पाहिल्यावर अनिलांची प्रेमाची कविता संपली अशी अनेकांना हळहळ वाटली. पण या पुस्तकांत संकलित केलेल्या गेल्या दहा वर्षांतलि कविता पाहिल्यावर हें ध्यानात येतें कीं जुन्याच आशयाभोंवती गिरक्या घेत न राहतां कवीच्या प्रेमवृत्तीनें नवीन दिशा धरली आहे. या परिणतींत परिस्थितीच्या जाणीवेची साक्ष आहे.

प्रीति तुझी माझी
नाहीं निराळेपणाची
जगांतल्या सुखदुःखीं
मिळालेपणाची !

फुलवातीतील "सर्व सुनें मज तुझ्यावांचुनी, करावयाचें काय वांचुनी, व्यर्थ जगाच्या पुढें नाचुनी" ( १९२२ ), यांतील १९३४ चें "घरांत रंगता —जग विसरतां" आणि १९४४चें " प्रीति तुझी माझी। नाहीं निराळेपणाची-जगांतल्या सुखदुःखीं। मिळालेपणाची" —यांत अनिलांच्या काव्यविकासाचें सूत्र आहे. "आंदोलत, आणि हिंदकाळत विकासत नित्य!—म्हणून 'फुलवात' व 'पेर्तें व्हा' ( म्हणजे त्यांतील बंड, मानवता, धडकी, पेर्ते व्हा इत्यादि कविता) यांत विसंगति नाहीं. एकाच प्रगल्भ आणि भावसमृद्ध वृत्तीच्या त्या दोन बाजू आहेत.

या समृद्धींत अनिलांच्या कवितेचें सौंदर्य, तिचें 'चिरयौवन' आहे. बदलत्या जगाचे संस्कार, येत्या 'वादळाच्या खुणा' तिच्यावर उमटलेल्या दिसतील. हतभाग्यांच्या वेदनांवर गुलगुलीत शब्दांची फुंकर घालणारी ही कविता नव्हे. ही कविता राष्ट्रवादी नाही. पण राष्ट्रीय आहे—आणि तीसुद्धां फार मोठ्या अर्थानें; त्या शब्दाला आजवर चिकटविण्यांत आलेल्या कोत्या अर्थानें नव्हे.

खास उद्या उठताल
हे भुकेकंगाल
भविष्य दिसून
रोमांच स्फुरून
येत थरथरून
धडकी सरे !

देशभक्तीच्या ढोंगानें गरिबीचा प्रश्न सुटत नाहीं—कदाचित् अधिक बिकट होतो.

अरे! जी तुम्ही ही स्थिति निर्मिली
मुळांतच आहे ती चुकली
जेथें माणसा काम न मिळे
काम करतांहि पोटापुरतें मिळे न मोल
आहे तो समाज मतलब्यांचा
परपुष्टांचा नफेबाजांचा!
रक्तशोषक जळवांचाच!

पण संस्कृतीचा डौल मिरविणाऱ्या या रक्तशोषकांना उद्यां आपल्या पापांची फेड करावी लागेल.

पण पाहा आतां होऊं लागले
धरणीकंप
येऊं लागले दुरून ध्वनी
पृथ्वीच्या अथांग उदरांतुनी
उकळत आहे आंत तप्तरस!
वरती सुंदर फुललेल्यांनो
ध्यानांत ठेवा ! आहे खालतीं
सुप्त ज्वालामुखी!!

अशी ही नव्या सामाजिक जाणीवांची कविता आहे. "अवघ्या अभाग्यांचे अश्रू ! उभे आमच्या डोळ्यांत" ही तिची भूमिका. आतां माणूस आपल्यापुरता जगूं शकत नाही, तो अनेकांतील एक आहे व त्याचें भवितव्य स्वतंत्र नाही. आत्मनिष्ठेनें उभारलेलीं उबदार घरटीं पाहातां पाहातां उध्वस्त होतील.

कुठें तरी पेटला वणवा
भडके बन सारे

आणि

किति दूरचि लागे झळ
आंतल्या जीवा

अशा या व्यापक सहानुभूतीला अनिल प्रक्षोभ रसाचें स्थान देतात. शृंगारवीरकरुणादि नवरस ढवळून विरलो, आतां "स्थापायास अधिराज्य समतेचें" उद्दाम बंड हवें त्याचा रस प्रक्षोभ. हा रस चालू जीवनाच्या किमयेंतून, परिस्थितीच्या घर्षणांतून, निघाला आहे; साहित्यशास्त्राच्या ग्रंथांतील कृत्रिम रसायनानें नाहीं. अनिलांच्या गेल्या आठदहा वर्षांतील बहुतेक कविता या प्रक्षोभानें 'रसरसून' निघाल्या आहेत. त्यांच्या युद्धविषयक कविता (विजय होतां, शांततेचे पुनरागमन') या दृष्टीनें वाचनीय आहेत.

ही जाणीव काव्याच्या आशयाशी एकरूप झाली नाही तर आगंतुक म्हणून बोंचू लागेल अशी भीति कित्येकांस वाटते, ती अकारण नाहीं. स्थलाभावीं या प्रश्नाची चर्चा येथें नको. पण कवीने आपल्या प्रचीतीशी इमान राखलें, सोंग म्हणून कशाचा अंगिकार केला नाहीं, कीं तो आक्षेप गळेल. 'पेतें व्हा' मधील उत्कटता तसें करण्यास समर्थ आहे. 'भग्नमूर्ती'पासून किंबहुना 'प्रेम आणि जीवन' पासून, अनिलांच्या कवितेंत उपदेशकाची कठोर

आढ्यता आली आहे या प्रवादाला ' अरे ' वगैरे संबोधनांची खैरात बळकटी आणते असें वाटतें, पण तो 'सावेश वाणी'चा, जीवनशोधक काव्यदृष्टीचा भाग आहे, असें त्यांच्य कवितेच्या एकंदर ओघावरून, आणि तन्मयतेवरून म्हणावें लागेल.

या अथांग काव्यतत्त्वांतून 'देतें व्हा' ही सुंदर कविता उमलली आहे. पावसाची सूचना देणाऱ्या पक्ष्याधिपर्थीची ही कविता म्हणजे एक भव्य रूपक आहे. ग्रीष्माचा पालापाचोळा दूर सारून, व्याकुळ पृथ्वीला नवजीवन देणाऱ्या वर्षाकालाचा हा संदेश आहे.

नव बीजें पेग
नव्या आशा धरा...

कोकिळ आणि बुल्बुल यांचें विलासी वसंतवैभव तगमग होऊं लागली कीं मुकें होतें. त्या मृगजळाला न भुलतां मेघाची आणि विजेची प्रतीक्षा करणारा हा पक्षी पाहिल्या थेंबानें थरथरतो आणि नवनिर्मितीचा संदेश मुक्तकंठानें ' भराऱ्या घेत बेफामपणें ' गातो. तें संगीत या कवितेंत सांठविलें आहे. मुखपृष्ठावर चित्रकारानें तेंच रेखांकित केलें आहे.

—(प्रा.) मं. वि. राजाध्यक्ष

रुद्रवीणा—

[ कवि— कान्त. प्रका० न. मा. कुलकर्णी, प्रतिभा प्रकाशन, औरंगाबाद; मूल्य ३ रुपये ]

गेल्या दहाबारा वर्षांत मराठी काव्यांत एक नवीनच संप्रदाय रूढ होत आहे. रूढी, अन्याय, दंभ याविरुद्ध बंड; समता, मानवता व विश्वबंधुत्व यांचा पुरस्कार व रक्तरञ्जित क्रान्तीची घोषणा हें त्याचें सामान्य स्वरूप म्हणतां येईल. कुसुमाग्रजांनी उभारलेल्या या क्रान्तीच्या झेंड्याखाली जे नवकवि उभे आहेत व अन्याय, अत्याचार, जुलूम व गुलामगिरी यांचा तीव्र निषेध करून मानवतेचा व समतेचा पुरस्कार करीत आहेत त्यांत औरंगाबादचे तरुण कवि श्री.कान्त यांचा अवश्य समावेश केला पाहिजे. ' रुद्रवीणा ' या त्यांच्या नुकत्याच प्रसिद्ध झालेल्या काव्यसंग्रहांत या नव्या संप्रदायाचें अत्यंत जळजळीत स्वरूप दिसून येईल.

' रुद्रवीणा ' या काव्यसंग्रहाचें स्वरूप द्विविध आहे. पहिल्या भागाच्या सुरवातीला त्यांनी ' रुद्रास आवाहन ' करून

" नेत्रानलिं करुनी त्रैलोक्याची होळी
अन्याय असमता रगडत पायांखाली
कर तांडव रुद्रा, विराट विश्वचितेंत "

अशी रुद्रास विनवणी केली आहे तर दुसऱ्या भागाच्या सुरवातीस ' वीणावती 'स त्यांनी

" तूं छेडुनि वीणा मंद्र मधुर झंकारी
कर मुक्त गीत या चिरदुःखित हृदयांचें
वाहुनी आण अन् अमृत निज अन्तरिंचें "

अशी विनंती केली आहे. त्यामुळे पहिल्या भागांत रौद्ररसाचा आविष्कार व दुसऱ्या भागांत कोमल भावनांचा आविष्कार असावा, असें स्पष्ट होत आहे. एकाच अन्तःकरणांतील दोन विरोधी भावनांचा आविष्कार पाहणें मोठें मनोरंजक ठरेल.

म. सा. प. (२१-३-५)

कान्तांच्या रुद्राराधनेचें स्वरूप विविध आहे. कुठे पुराणमूर्ति खंड खंड करणाऱ्या 'मूर्तिभञ्जका 'चा अभिनिवेश आहे तर कुठे शब्दाचें मोल देतांना 'निजतनुखंड' तराजूंत ठेवून आपली भाषा तोलण्यास कवीला आव्हान आहे. कुठे प्रतिकूल दैवाला आव्हान तर कुठे दलितांच्या सुप्त स्वातंत्र्यप्रेमाला आवाहन आहे; 'सांडितां कुणास्तव रुधिर तरी' 'तोडूं कडी चला' अशासारख्या कांही कवितांतून जळजळीत देशाभिमान आहे तर "नवें वर्ष" 'गाशिल का हें गान' अशासारख्या कांहीं कवितांतून मानव्याच्या चाललेल्या विटंबनेबद्दल व्यक्त केलेली चीड आहे. अशा रीतीने प्रकट झालेला रौद्ररसाचा आविष्कार मोठा प्रभावी वाटतो. या भागांतून त्यांच्या कल्पनेचें तांडवनृत्य चालू असल्याचा क्षणभर आपणाला भास होतो. ठिकठिकाणीं जळजळीत क्वचित् भयानक प्रतीकांचा व त्याला तोलेल अशा कणखर भाषेचा कान्त यांनी आश्रय केल्याचें दिसून येतें. त्यामुळे या सर्व भागांतून विराटस्वरूपी रुद्राच्या तांडवनृत्याचीच जाणीव आपणांस होऊं लागते. 'नवें वर्ष' या कवितेतील खालील ओळी पाहा—

> "कंठीं नररुंडाच्या माळा
> साम्राज्याचें भस्म कपाळा
> प्रेतावरती नाच मांडला
> ओल्या मानवचर्माचें करिं निशाण फडकाविलें । आज हें नवें वर्ष पातलें.

किंवा 'गाशिल का हें गान' या कवितेंत नवगीताची सखोल कल्पना देताना ते म्हणतात.—

> "अडवूं जुलमाचे रणगाडे
> शिशु लोटिति निज तनुसांगाडे
> त्यांच्या पिचल्या मउ हाडांचें या ओळिंत आव्हान !
> लज्जारूपा विवस्त्र केलें
> यौवनवस्त्रचि फाडुनि लुटिलें
> या लज्जेचे रंग वाहती जळताचि रक्तसमान । सखे तूं गाशिल का हें गान !"

या साऱ्या कल्पना वाचतांना त्यांचा रौद्ररसाचा आविष्कार क्वचित् अतिरंजित वाटेल; रक्त-मांस-चिखल, अश्रुधारा, दावाग्नि, वज्र, अग्निपंख इत्यादि शब्दांची किंवा त्यांच्याशीं संगडित असलेल्या कल्पनांची पुनरुक्ति झालेली वाटेल; पण त्याच्यामागे असलेला अभिनिवेश ज्वलन्त आहे हें मान्य करावयास हवें. जगांत मानव्याच्या चाललेल्या विटंबनेबद्दल त्यांना वाटणारी चीड त्यांतून स्पष्ट दिसते. 'विराट् जागरण' या काव्यांत विराट जन एकदा जागा झाला म्हणजे काय होईल याची कल्पना देतांना किंवा 'अग्निपंख नाभिं फडफडुं दे' या कवितेंत क्रान्तिदेवीला विद्युच्चरणीं यावयास सांगून जनमनांत असंतोष भडकवून देण्यास सांगतांना प्रकट होणारा भावनाविष्कार ज्वलन्त वाटेल. अन्याय, अत्याचार, दास्य व निरपराधी जीवांचा होणारा होम पाहातांना अन्तःकरणांतील भारावलेल्या भावनांनी त्यांनी क्रान्तीदेवतेला आवाहन करावें, 'शृंगाराचें दिप मालवून; चल नूपुरनटनाट थांबवून, जुन्या जगाची कुचकी दांडी लववून तोडण्याची' आकांक्षा मनांत धरावी,

> "सुखसदनीं नच आम्हा रमणें
> नच हास्याच्या उन्हांत फिरणें
> कांट्याच्या अणिवरच्या गांवीं जाणें भाग अम्हांला !"

असें आपल्या साजणीला सागून 'अपुला पंथ निराळा' याची तिला जाणीव द्यावी व घणावर घण घालून व असीम दिग्बंधन तोडून स्वरमंदीर, स्वप्नदीप, यज्ञवेदी, राजदंड भग्न करण्याची त्यांनी प्रतिज्ञा करावी यांत नवल तें काय ?

यांच मानवतेच्या वृत्तींतून त्यांची देशाभिमानाची ज्वाला उफाळलेली दिसून येते. 'सदरा', 'फितूर' 'तुज बोलवी देवगिरी'' 'दुदुंभि आमुच्या वनवा' इत्यादि कांहीं गीतांतून त्यांचा जाज्वल्य देशाभिमान प्रकट झालेला दिसतो.

'देवि येते घरा' या कवितेंत स्वातंत्र्यदेवीच्या स्वागतार्थ तिचें पात्र 'रक्तधारा भरे, भरविण्याची विनंती करतात तर 'तोडूं कडी चला' या कवितेत अंग सोलून केलेल्या स्वतंत्रतेच्या झेंड्याला कोणती सत्ता पाडूं शकेल तें पाहूं असें आव्हान देतात. त्यांच्या देशाभिमानी वृत्तीची व स्वातंत्र्यलालसेची साक्ष या गीतांतून चांगली पटते.

त्यांच्या क्रांतिगीतांकडून प्रेमगीतांकडे वळणें म्हणजे दावानलाच्या रुद्र स्वरूपाकडून उद्यानाच्या रम्य स्वरूपाकडे वळण्यासारखें आहे. या भागांत भावनेची उत्कटता आहे, कल्पनेची कोमलता आहे व प्रतिभेच्या विलासाचा विविध आविष्कार आहे. 'तें तुझेंच गाणें या कवितेंत ते म्हणतात—

" अथांग तव शर्वरी लोचनें
क्षितिज हसे जणु पिउनि चांदणें
तुझे नयन नित नवे घालिती निळें उखाणें ग "

किंवा 'वसंत ये मी' या कवितेंत ते म्हणतात—

" मी खळखळतां तुफान फेनिल दर्यावर ये पूर
मृद्गंध धुंदिमधीं चूर
" तूं जलवन्ती, नाच चाळ त्या फेनाचे लेवून
पुराचें तरुण गान घुमवून
साजणी मधुर मदिर गाऊन "

या त्यांच्या कवनांतून 'मधुरमदिर' भावनांचा आविष्कारच जणू सगळीकडे झालेला दिसतो. 'प्रीतीचे मोल' मध्यें आपल्या साजणीला प्रीतीचें वर्णन करून सांगताना, 'ये पूर्ण कराया चित्र गडे' अशी आपल्या प्रियतमेस विनंती करतांना, 'भर सखये भर पुरती ओंजळ' असें आपल्या सखीस सांगतांना व्यक्त झालेला कोमल भावनांचा आविष्कार अत्यंत रम्य वाटतो. कांहीं कवनांतून अभिनव कल्पनाविलासाचे नमुने तर जागोजाग आढळतात. उदा० 'पदरंजन' मध्ये ते म्हणतात—

" सहज मृदुल तव पाउल पडतें
तरुण हृदय त्या तिथे चिरडतें
रक्त तेंच तव पदीं लागतें.
ही कशास मेंदी मग वरुनी
रंगवू नको निजपद रमणी

किंवा 'तूं दार उघडाशिल सांग कसें' यांत ते म्हणतात—

" मृदुलधवल शशिकिरण येउनी
उघडिति कुमुदां हंसुनि मूकपणीं
येशिल कां गे, तूंहि साजणी

स्वप्नें मधु पेरित निज हास्यें?
तूं दार उघडशिल सांग कसें? "

अशा त्यांच्या अभिनव कल्पनांतून व्यक्त होणाऱ्या नाजूक भावना मोठ्या रमणीय वाटतात. श्री. कान्त यांच्या प्रेमकाव्यांतील नायिका या जणू कांही जीवनांतील सर्व सुंदर व कोमल गोष्टी घेऊन घडविल्यासारख्या वाटतात. आणि म्हणूनच त्यांचें स्वरूप अविस्मरणीय झालें आहे. दीर्घ बदामी डोळयांची त्यांची हसत राहणारी शेजारीण, मृदुल रेशमी कुरळ मोकळा कचभार असलेली रमणी, तपकिरी व किंचित् गहिरे डोळे असलेली त्यांच्या जीवनांत उशीरा आलेली नायिका, तरुणांच्या हृद्कमलीं नाचणारी अलबेली नार, व ज्वानीच्या वाऱ्यानं चांदण्यांत जणू केळफूलच कांपत आहे असें वाटावयास लावणारी, लगदग घाट चढणारी नार—हीं सारीं रमणींचीं चित्रें अत्यंत आकर्षक वाटतात. त्यांच्या प्रेमगीतांत जणू मधुर स्वप्नांची सृष्टीच साकार झाली आहे असें वाटतें.

श्री. कान्तांच्या काव्याचें स्वरूप हें असें आहे. रौद्र रसाच्या आविष्कारांत त्यांच्या प्रतिभेने रसिकांना भयानकांतून फिरविलें आहे-चीड, उद्वेग, विषाद या भावनांनी भारावलेल्या त्यांच्या प्रतिभेने अग्नीचा व अंगाराचा वर्षाव केला आहे; पण वीणेच्या झंकाराने ती मृदु व कोमल बनून तिने सौंदर्याचा फुलबाग फुलविला आहे. त्यांच्या प्रतिभेचें स्वरूप असें अभिजात आहे. म्हणूनच त्यांच्या भविष्यकालीन कलाकृतीकडे अत्यंत आशावादीपणें पाहात बसावेंसें वाटतें.

—(प्रा.) म. ना. अदवन्त.

**मंजरी--**

[ कवयित्री—कृष्णाताई वैशंपायन, बी. ए; प्रकाशक—ल. ना. चापेकर, आर्यसंस्कृति मुद्रणालय, टिळक रस्ता, पुणें २ ; किंमत २ रुपये ]

चालू पिढीच्या मानाने ज्यांना मागील पिढींतील म्हणतां येईल अशा एक कवयित्री कृष्णाताई वैशंपायन यांच्या सुमारें पन्नास कवितांचा हा संग्रह आहे. कवींच्या चालू पिढींत देखील कवयित्रींची संख्या हाताच्या बोटांवर मोजण्याइतकीच जेथे आहे, तेथे मागील पिढींत ती किती असेल याची कल्पना करणें सहजशक्य आहे. कृष्णाताईंनी दोन तपांपूर्वीच रचलेल्या या कविता आहेत; या दृष्टीने पाहिल्यास कवयित्रीचें कौतुक करावेंसें वाटतें. अर्थात् कालौचित्यानुसारें पाहतां विषयांच्या व रचनेच्या दृष्टीने अगदी अद्ययावत्पणा मंजरीमध्ये अपेक्षिणें बरोबर होणार नाही. काव्यरचनाकालीं, म्हणजेच रविकिरण मंडळाचे काळीं, रूढ असलेल्या वैशिष्ट्यांचें प्रतिबिंब या संग्रहामध्ये अनेक ठिकाणीं दिसून येतें. अनेक सुनीतांची, गझलांची रचना ही या दृष्टीने पाहाण्याजोगी आहे.

कवयित्रीच्या दुःखी, वैधव्यग्रस्त जीवनाचे पडसाद कांही कवितांतून उमटले आहेत ते करुणोत्कट आहेत. ' कल्पनाच दे ', ' एकटा जीव ', ' पत्त्यांचा बंगला ' ' एकान्तास ', " दुर्दैवी ' इत्यादि कवनांतील सूक्ष्म करुण भावना मनाला चटका लाविल्याशिवाय राहत नाहीत. ' गुंतागुंत ', ' प्रेमवेली ', ' अश्रु ' इ० मधील हळुवार स्त्रीवृत्ति तर वैशिष्ट्याने प्रकट झाली आहे. स्त्रीगीतासारखें ' धावा ' नांवाचें एक गीत या संग्रहांत आहे. त्यांतील सीतेचें व्याकुळ अंतःकरणहि चांगलें रेखाटलें आहे. इतर हि कविता नीरस नाहीत; परंतु भावनेची उत्कटता किंवा कल्पनेची भरारी यांचा अधिक

आढळ झाला असता तर काव्यांचा सरसपणा वाढला असता असें म्हणावेंसें वाटतें कवयित्रीच्या ठिकाणीं असलेल्या काव्यशक्तीची कल्पना या संग्रहावरून येते; पण त्या शक्तीचा पूर्ण विकास आणि विलास येथे आहे असें म्हणतां येणार नाहीं.

अंजनी.—

[ संपादक व प्रकाशक--पां. श्री. टिल्लू, ३८ झावबाची वाडी, ठाकुरद्वार, मुंबई २; किंमत सव्वा रुपया. ]

मराठींतील अर्वाचीन कवींनी लिहिलेल्या बालगीतांचा हा सुंदर चित्रांनी नटलेला संग्रह आहे. यांत केशवकुमार, गायदेव, साने गुरुजी, कुसुमाग्रज, शांता शेळके प्रभृति नामवंत कवींच्या कवितांबरोबरच अनेक नवोदित कवींच्याहि कविता संग्रहित केलेल्या आहेत. अभिनयगीतें, कूटकविता, विनोदगीतें, शब्दाचित्रें यांबरोबरच एखाददुसरी बोधकविताहि येथे आहे. संपादकांनी अशा रीतीने निवड करण्यामध्ये विविधता आणण्याची योग्य ती खबरदारी घेतली आहे; तथापि या संग्रहांत मराठी बालगीतांतील सर्व काव्यात्मकता प्रकटली आहे असें नाही. दत्त कवींच्या वेळीं मूळ धरूं लागलेला बालगीत हा काव्यप्रकार आता किती अंकुरित व पल्लवितहि झालेला आहे हें या 'अंजनी' वरून स्पष्ट कळतें. मात्र जुन्यानव्या कवींच्या उत्तमोत्तम 'बालगीतांचें नवनीत' आणखीहि चांगलें निर्माण करणें शक्य आहे हा विचार 'अंजनी' वाचतांना मनांत आल्याशिवाय राहत नाही.

—(प्रा.) वि. म. कुलकर्णी.

**सोव्हिएट दर्शन**–[युगवाणी प्रकाशन, मुंबई; किं. २ रु; पृष्ठें ८ + ११२.]

**सोव्हिएत् राष्ट्रें व लोक**--[ले० दि. के. बेडेकर, चित्रशाळा प्रकाशन, पुणें; किं. १० आणे; पृष्ठें ६०.]

**सोव्हिएट आर्थिक नियोजन**,—[ले० अ. रा. कामत, चित्रशाळा प्रकाशन, पुणें; किं. २॥ रुपये; पृष्ठें १४०.]

सोव्हिएट रशियांतील सामाजिक व वैयक्तिक जीवनाबद्दल आपल्याकडे अलीकडे बरीच जिज्ञासा निर्माण झाली आहे. पण त्या मानाने ती पूर्ण करण्याचीं साधनें मात्र उपलब्ध झालेलीं नाहीत. जीं आहेत त्यांत वृत्तपत्रीय लिखाणास आणि बातमीपत्रांस प्रमुख स्थान दिलें पाहिजे. परंतु या प्रकारचें लिखाण सामान्य वाचकास आपली जिज्ञासा भागविण्यास फारसें उपयोगी पडत नाही. एक तर त्यांतील माहिती ही फार त्रोटक असते, आणि दुसरें असें की त्यांत तात्कालिक दृष्टया महत्त्वाच्या वाटणाऱ्या घडामोडीच विशेष भडक रंगांत चितारलेल्या असतात. मुख्यतः सोव्हिएट समाजव्यवस्थेविरुद्ध प्रचार करणाऱ्या देशी व परदेशी वृत्तसंस्थांकडून या माहितीचा प्रसार होत असल्यामुळे तींत सत्यासत्येची विशेष छाननी केली जात नाही. त्यामुळे सोव्हिएट रशियासंबंधी मिळणाऱ्या माहितीपैकी बराच भाग विकृत विधानांनी आणि अर्धसत्य वर्णनांनी भरलेला असतो असा अनुभव आहे. या परिस्थितींत, पूर्वग्रह बाजूला ठेवून, ज्या समाजव्यवस्थेने पंचवीस तीस वर्षांपूर्वी अत्यंत मागासलेला समजला जाणारा देश तेवढ्या अल्प अवधींत, शास्त्रीय प्रगतींत अग्रेसर असलेल्या जर्मनीशीं यशस्वी टक्कर देतां येईल अशा स्थितिप्रत आणून ठेवला, त्या समाजव्यवस्थेची संगतवार व आस्थाबुद्धीने जमविलेली माहिती पुढे मांडण्याची आवश्यकता आहे

याबद्दल दुमत होणार नाही. या दृष्टीने कांही अंशीं तरतूद करणाऱ्या वरील तीनहि पुस्तकांचें मराठी वाचकवर्गानें स्वागतच केलें पाहिजे.

यापैकी 'सोव्हिएट दर्शन' हें पुस्तक पुणें येथील सोव्हिएट मित्र-संघ या संस्थेमार्फत प्रकाशित झालें असून सोव्हिएट समाज, जीवन व वाङ्मयविषयक आठ लेख त्यांत एकत्रित करण्यांत आले आहेत. या लेखांवरून त्या त्या विषयासंबंधी सर्व ज्ञान होईल असा लेखकांचा दावा नाही. अंधारांतून जात असतां विजेच्या बत्तीने टाकलेल्या प्रकाशाच्या झोतांत ज्याप्रमाणे पुढील वस्तूंची फक्त स्थूल मानाने कल्पना येऊं शकते, तितपतच या लेखांतून सोव्हिएटचें जीवनदर्शन घडूं शकतें. पण त्यामुळे त्याची भव्यता आणि त्यांतील चैतन्य व मानव्य यांची ओळख पटल्याशिवाय राहात नाही. रशियन रंगभूमि, कविवर्य रवींद्रनाथ टागोर यांचे रशियावरील विचार, सोव्हिएट आरोग्यव्यवस्था, तेथील धर्मस्वातंत्र्य, शिक्षण इत्यादि विविध क्षेत्रांतील प्रगति, सोव्हिएट वाङ्मयाचा एक नमुना, चुकची नांवाच्या वन्य जमातीची महत्प्रयासाने पण यशस्वी रीतीनें घडवून आणलेली प्रगति या विषयावरील हे लेख वाचनीय झाले असून आपल्यासारख्या मागासलेल्या समाजां तील व्यक्तींना स्वोन्नतीविषयी खात्रीने आत्मविश्वास वाटावयास लावणारे आहेत. इतकें असूनहि सोव्हिएटला विरोध करण्याचें धोरण कां अवलंबिलें जातें, या प्रश्नाचें विवेचन प्रा. कोल्हटकर यांनी त्या विरोधामागील अर्थकारणाचें विश्लेषण करून केलें आहे, व त्यामुळेहि वाचकांच्या विचारांस चालना मिळाल्याशिवाय राहाणार नाही. हा लेखसंग्रह सोव्हिएट मित्र–संघामार्फत प्रकाशित झाला आहे याच कारणास्तव त्याकडे 'प्रचारकी वाङ्मय' म्हणून पाहिलें जाण्याचा संभव आहे. परंतु ग्रंथाच्या सुरवातीसच संघाचे अध्यक्ष प्रा. रा. ना. दांडेकर यांनी दिलेल्या विस्तृत परिचयावरून संघाची भूमिका या थाटाची नाही याबद्दल संदेह राहाणार नाही. 'सोव्हिएटसंबंधी मित्रभाव म्हणजे तेथील सर्व गोष्टींच्या चांगुलपणाविषयी अंधश्रद्धा नव्हे व तिच्या पोटीं उद्‌भवणारी अनुकरणाची इच्छाहि नव्हे' असा निर्वाळा प्रथमच डॉ. दांडेकर यांनी दिलेला आहे.

श्री. दि. के. बेडेकर हे त्यांच्या 'संयुक्त महाराष्ट्र' या नव्या ग्रंथामुळे मराठी वाचकांच्या आता चांगलेच परिचयाचे झाले आहेत. त्यांची अभ्यासू वृत्ति, वृथाभिनिवेशापासून अलिप्तता आणि शास्त्रीय दृष्टिकोन यामुळे मराठी लेखकांतच नव्हे तर विचारवंतांतहि त्यांना मानाचें स्थान प्राप्त झालेलें आहे. 'सोव्हिएट राष्ट्रें व लोक' या आपल्या छोटेखानी पुस्तिकेंत त्यांनी सोव्हिएटमधील राज्यव्यवस्था, तेथील अल्पसंख्य जनसमूहांचें संरक्षण, स्वयंनिर्णयाचा अवलंब, औद्योगिक उन्नतीचें धोरण इत्यादि विषयांचें थोडक्यांत पण संगतवार आणि मुख्यतः वर्णनात्मक विवेचन केलेलें आहे. आज सोव्हिएट रशिया या नांवाने संबोधला जाणारा जनसमूह किती भिन्न राष्ट्रीय, सांस्कृतिक व वंशीय आहे, आणि इतकें असूनहि त्यांत या सर्वांच्या सर्वांगीण उन्नतीची तरतूद कशा प्रकारें करण्यांत आलेली आहे याची माहिती थोडक्यांत देणारें दुसरें पुस्तक मराठी भाषेंत सांपडणार नाही.

सोव्हिएट जीवनाच्या कोठल्या क्षेत्राबद्दल जास्तींत जास्त वादग्रस्त मुद्दे पुढे आणले गेले असतील तर ते म्हणजे आर्थिक व्यवस्थेचें क्षेत्र. विशेषतः समाजाच्या हातीं असलेल्या नैसर्गिक आणि मानवी साधनसामुग्रीचा पूर्वनियोजित पद्धतीने उपयोग करून जनतेचें जीवन अधिकांत अधिक समृद्ध करण्याचें जें नवें तंत्र सोव्हिएट रशियाने प्रथम जगापुढे आणलें त्याबद्दल उलटसुलट चर्चा आजहि मोठ्या हिरीरीने होत आहे. तेव्हा सोव्हिएट

आर्थिक नियोजन म्हणजे आहे तरी काय हा प्रश्न सामान्य व्यक्तींच्या मनांत विशेष प्रामुख्याने आल्यास आश्चर्य वाटण्याचें कारण नाही. या प्रश्नाचें उत्तर सुबोध व तुलनात्मक पद्धतीने देण्याचें कार्य प्रा. अ. रा. कामत यांनी आपल्या ग्रंथांत उत्कृष्ट रीतीने केलें असून त्यावरून सोव्हिएट आर्थिक नियोजन व भांडवलदारी आर्थिक व्यवस्था यांतील फरक स्पष्ट होण्यास पुष्कळच मदत होईल. प्रा. कामत यांचें पुस्तक आजच्या दिवसांत तात्कालिक दृष्ट्याहि औचित्यपूर्ण असून हिंदी आर्थिक व्यवस्थेबद्दलचें धोरण कसें असावयास पाहिजे याची स्थूल कल्पना अर्थविषयक तात्त्विक प्रश्नांचा अभ्यास झालेला नसणाऱ्यांनाहि त्यामुळे येऊं शकेल. अर्थात् देशाची औद्योगिक प्रगति झपाट्याने होऊन जनतेचें राहाणीचें मान आजच्याहून वरच्या पातळीवर आणलें पाहिजे ही विचारसरणी मान्य असणाऱ्यांनाच प्रा. कामत यांनी पुरस्कारलेला मार्ग पटण्यासारखा आहे. पण अशीच विचारसरणी आज सर्वत्र प्रसार पावत असल्यामुळे इतरांनाहि आज ना उद्या त्याच मार्गाचा पाठपुरावा करण्याशिवाय गत्यंतर राहाणार नाही हेंहि तितकेंच स्पष्ट आहे. नियोजित अर्थव्यवस्थेंत व्यक्तिस्वातंत्र्य टिकूं शकत नाही हा मुद्दा प्रतिपक्षीयांकडून जोराने पुढे आणला जातो. त्यासंबंधी रशियांतील अनुभवाच्या आधारें प्रा. कामत यांनी केलेलें विवेचन सर्वांनाच उपयुक्त वाटेल. एकंदरीने हीं तीनहि पुस्तकें रशियासंबंधी जिज्ञासा वाटणाऱ्यांना स्वागतार्ह वाटतील याबद्दल शंका नाही.

—(प्रा.) ल. बा. फोगेकर.

**काळ खेळतो आहे—**

[ लघुनिबंध संग्रह— प्रा. वि. पां. दांडेकर, प्रका०— नॅ. इं. ॲन्ड प. लि. मुंबई. किंमत २ रुपये. ]

'गेल्या पांच वर्षांत लघुनिबंध या वाङ्मयप्रकाराला ओहोटी लागली आहे' अशी टीकाकारांची तक्रार ऐकून या वर्षाच्या आरंभीं खांडेकरांनीं आपला 'तिसरा प्रहर' हा लघुकथासंग्रह प्रसिद्ध केला व लघुनिबंधप्रकाराला ओहोटी लागली हें विधान चुकीचें व तर्कदुष्ट असल्याचें विवेचन केलें. या खांडेकरांच्या विवेचनाला पाठिंबा देण्यासाठींच कीं काय श्री. वा. पु. दामले यांचे 'सुखसंवाद' व प्रा. दांडेकर यांचे 'काळ खेळतो आहे' हे दोन लघुनिबंधसंग्रह बाहेर पडले आहेत.

प्रा. दांडेकर ह्यांचा हा चवथा संग्रह आहे. ह्यांत विषयवैचित्र्याप्रमाणेंच गुणदोषवैचित्र्यहि आहे. प्रा. दांडेकरांच्या लेखनांत आत्माविष्कार व खेळकरपणा भरपूर आहे. किंबहुना भाषेचें लालित्य अथवा अलंकारिकत्व फारसें नसूनहि त्यांच्या निबंधांना जें मोल प्राप्त होतें त्याचें रहस्य त्यांच्या मनमोकळ्या आत्मप्रकटीकरणांत आहे. त्यांचे हे निबंध वाचलें कीं, खरोखरच कपड्यालत्त्याच्या व बोलण्यासवरण्याच्या वागण्यांत जो अघळपघळपणा प्रत्यक्ष अनुभवास येईल त्याचीच छटा लेखनांत उमटली आहे हें पटेल. 'काळ खेळतो आहे, सारखे चेहेरे, खरंच जगण्यांत मौज आहे, जमेचिना घडेचिना' हे निबंध या साध्यासुध्या मोकळेपणानें केलेल्या आत्मनिवेदनामुळेंच रमणीय वाटतात. आणि मला वाटतें हेंच खरें एकमेव वैशिष्ट्य दांडेकरांना फडके—खांडेकर—काणेकर यांच्या वर्गांत बसवितांना सांगता येईल. प्रा. दांडेकरांच्या निबंधांत सामान्यतः जीवनविषयक उत्साहपूर्ण व आशावादी मंगल सूर उमटलेला ऐकूं येतो. ही जाणीव कांहीं निबंधांत स्वतः लेखकालाच इतक्या तीव्रतेनें होते कीं, तिचें अवास्तव विवेचन करण्याचा मोह त्यांना होतो. उदाहरणार्थ 'मिळवूनी

त्रिभुवनींच्या ललना' ह्याच रमणीय मथळ्याचा निबंध घ्या. त्रिभुवनींच्या रमणीय ललना समोर आल्यावरहि मानवी जीवन सुखी होण्याचें अप्रस्तुत तत्वज्ञान सांगण्याचा मोह त्यांना होतो. 'आम्ही आहोंत गाधी'मध्यें रूढींवर ते घसरतात आणि समाजाची सुवर्णशिखरें प्रो. म. शि. गोळे यांच्या आधाराखेरीज ते वर्णू शकत नाहींत.

लघुनिबंधकार हा जीवनाचा भाष्यकार खरा पण तो आत्मनिष्ठ कलावंत प्रथम आहे. नाहींतर निबंध व लघुनिबंध यांत फरक तो काय ? प्रा. दांडेकरांच्या विचारांत सोज्वळता आहे, भाषेंत सोपेपणा आहे, सरणींत मोकळेपणा आहे आणि अवलोकनांत मार्मिकपणाहि आहे. त्यामुळें त्यांचा हा निबंधसंग्रह 'तात्विक' वाटत असूनहि ताज्या सुगंधी फुलांच्या गुच्छाप्रमाणें हवाहवासा वाटेल.

(प्रा.) म. वि. फाटक.

**श्री बसवेश्वर—**

[ ले.— डॉ. म. गो. माईणकर, एम्. ए., पी. एच्. डी, आणि रा. द. गुरव; प्रका०—स्वाधीन साहित्य संस्था, लि. पुणें २. किं. दीड रु. ]

कल्याण येथील चालुक्यांचें राज्य त्यांच्याच एका मांडलिकानें—कलचुरी घराण्यांतील बिज्जलानें बळकावलें. त्या बिज्जलाच्या प्रधानकीचीं वस्त्रें कांहीं काळ ह्या थोर पुरुषाकडे होतीं. ह्यांच्यामुळेंच वीरशैव धर्माच्या प्रसाराला जोर व तेज आलें. ११२५ ते ११६८ असा यांचा काल. ज्ञानकोश, चरित्रकोश, मुसलमानपूर्व महाराष्ट्र वगैरे ग्रंथांतून ह्या थोर पुरुषाबद्दल आलेल्या माहितीचा प्रपंचविस्तार ह्या पुस्तकांत करण्यांत आला असून, बसवेशाबद्दलच्या प्रवादांना व त्याच्या कार्याला लेखकांनीं आपल्या तार्किक विचारसरणीची समर्थनपर व सविस्तर जोड दिली आहे. कर्नाटकांतील एका महान् व्यक्तीबद्दल जिज्ञासा उत्पन्न करणें ह्या माफक हेतूनेंच लेखक प्रवृत्त झाले असल्यामुळें ह्या चरित्राचें त्या दृष्टीनें स्वागतच होईल.

* * *

**रावबहादुर काने आणि गोविंदराव साने—**

[ ले.—ग. र. इनामदार, अकोला. प्र०—स्कूल—कॉलेज. बुकस्टॉल, कोल्हापूर. किं. अडीच रु. ]

विद्यार्थीदशेंतील चार—चौघे मित्र निरनिराळ्या व्यवसायांत पडल्यानंतरच्या एका कालखंडांतला पत्रव्यवहार इथें दिला आहे.प्रामुख्यानें कथा सांगण्यापेक्षां, निरनिराळी विचारसरणी, व व्यवसायभिन्नता व प्रापंचिक परिस्थिती यांमुळें बनलेला स्वभाव व समाज ह्यांचें दर्शन घडविणें हाच लेखकाचा हेतु दिसतो. एकान्तिक तत्वनिष्ठ व प्रसंगमानानुसार तडजोड करून चालू पाहणारे कार्यकर्ते, सरकारजमा प्रतिष्ठित व निस्संग समाजसेवक, अशा अनेक प्रकारच्या समाज—घटकांचे विचार लेखकानें जाणून घेऊन प्रदर्शित केले आहेत. मैत्रीच्या बैठकीवरून सर्व पत्रें लिहिलीं गेलीं असल्यामुळें समजुतदारपणा व सहानुभूति ह्यांचा आन्तर प्रवाह त्यांतून वाहत असलेला दिसतो. आणि नाहीं म्हटलें तरी, ह्या पत्रसंभारास थोडीशी कथात्मकता आली आहेच. मागच्या पिढींतील पांढरपेशा समाजाचें दर्शन ह्या पुस्तकाद्वारें घडत आहे हेंच ह्याचें वैशिष्ट्य.

—य. दि. पें.

## केळकरांच्या आठवणी

[ देशभक्त साहित्यसम्राट तात्यासाहेब केळकर यांच्या आठवणी
संग्रा० नि प्रका० श्री. स. वि. बापट–केसरी कार्यालय, पुणें,
मूल्य ८ रु. पृ. ६०० सुमारें. ]

एकच आख्यान अनेकदां पाळीपाळीनें प्रवचनार्थ अथवा कीर्तनांत रंगवावयाचे याला चक्रीपुराण किंवा चक्रीकीर्तन असें म्हणतात. एका थोर व्यक्तीसंबंधानें अनेकांच्या आठवणींचा संग्रह म्हणजे एक प्रकारें त्यांचें 'चक्रीचरित्र'च म्हणता येईल.

'लोकमान्य टिळकां'च्या आठवणीच्या तीन खंडांनीं हा वाङ्मयप्रकार महाराष्ट्रांत लहानथोरांच्या चांगल्या परिचयाचा झाला. एकाच निकटवर्ती माणसानें गतव्यक्तीच्या आठवणी लिहिण्यांत कालक्रम असतो. तसा क्रम अनेकांच्या आठवणींचा संग्रह करतांना राखणें कठीण असतें. जो तो लेखक विषयभूत व्यक्तीशीं त्याचा ज्या कालखंडामध्यें आणि ज्या प्रसंगांनीं परिचय झाला असेल तेवढाच भाग आपल्या आठवणींत देऊं शकतो.

चक्रीकीर्तनामध्यें जें चरित्र लावले असेल त्याचा क्रम एकामागून एक येणाऱ्या कीर्तनकारांना राखावा लागतो. पण आठवणी-संग्रहाचे तसे नाहीं. त्यांत स्थल-काल-प्रसंगाचा क्रम रहात नाहीं. कै. ग. स. मराठे यांनीं आपल्या थालीपीठांत योजलेला शब्द उपयोगांत आणून अशा प्रकारच्या आठवणींना "स्मृतिचित्रांची चक्रचक्री" असेंहि नांव देतां येईल.

लोकमान्य टिळकांच्या आठवणींचे संकलन करण्यांत यशस्वी झालेल्या श्री. सदाशिवराव बापटांनीं साहित्यसम्राट कै. तात्यासाहेब केळकर यांच्याहि आठवणी गोळा करण्याच्या कार्यास तशा भक्तिभावानें त्वरित प्रारंभ करून त्यांच्या वर्षश्राद्धाचे दिवशीच पावणेचारशे लोकांच्या आठवणींचा सहाशे पानांचा ग्रंथ प्रसिद्ध करण्याचा विक्रम केला.

लो. टिळकांसारखे उत्कट विभूतिमत्व आणि तसा पूज्यभाव केळकरांविषयीं महाराष्ट्रीय जनतेत नव्हता. पण कौतुक, आदर, स्नेह या भावनांचा केळकरांनीं मिळवलेला ठेवा विस्तारानें टिळकांच्या विभूतिमत्वाइतकाच मोठा होता. यामुळें अनेक क्षेत्रांतील लोकांच्या आठवणींचा या ग्रंथांत समावेश झाला आहे.

गतव्यक्तीसंबंधानें अधिक चरित्रपरिचय व्हावा ही जिज्ञासा उत्कट असेपर्यंतच आठवणीसंग्रहाला मागणी असणार म्हणून घाईनें हा संग्रह करण्यांत येतो. त्यांत वर्गकरणास वेळ मिळत नाहीं. अर्थात् ज्याला विशिष्ट स्थळ–काळ–प्रसंगाच्या अथवा विशिष्ट विषयाच्या आठवणी वाचावयाच्या असतील त्यांनें शेवटीं जी व्यक्तिसूची आणि विषयसूची दिली आहे त्यावरून मधले मधले भाग काढून वाचावयास पाहिजेत. त्यांत एक कालानुक्रम सूची दिली असती तर अधिक सोय झाली असती.

लो. टिळकांच्या आठवणी प्रसिद्ध झाल्याला दोन वर्षे होऊन गेली. या काळांत वाङ्मयाची भाषाच केवळ नव्हे तर सामान्य लोकांची भाषाहि किती बदलली आहे हें दोन आठवणीसंग्रहांच्या तुलनेनें दिसून येईल. भाषेच्या जडपणाऐवजीं रंजकता सामान्य माणसांचें लिखाणांतहि आली. हा बदल होण्यास जे अनेक वाङ्मयसेवक कारणीभूत आहेत त्यांत स्वतः केळकर हे अग्रगण्य मानावे लागतील. मरणोत्तर कोणी अवगुणांचें वर्णन करीत नाहीं. आपलेकडील चरित्रग्रंथहि गुणगौरवाचे हेतूनेच मुख्यतः लिहिले जातात. मग आठवणींचा संग्रह म्हणजे निव्वळ "गुणगौरवग्रंथ" व्हावा हें जवळजवळ अटळच

आहे. तसेंच इसापनीतीतील गोष्टींप्रमाणें कंठाळी रीत्या " तात्पर्य " सांगण्याच्या पद्धतीची सामान्य लोकांचे मनावरील पकड अद्याप सुटलेली नाहीं. आणि बहुतेक आठवणींचें तात्पर्य गुणोल्लेखपूर्वक सांगितले जातें. जणूं काय हें तात्पर्य सहज न कळण्याइतके वाचक ' बाल ' आहेत ! हे शेवटचे आठवणींतले शेरे किंवा शेंडे छापून टाकण्याऐवजीं छाटून टाकले असते तर बरे होते. कांहीं छाटले गेले असतील. पण बरेच राहिलेहि आहेत.

त्रोटक आठवणींनीं गुणांची अतिशयोक्ति होते, तसाच एक अन्यायहि आठवणी-विषयभूत व्यक्तीवर होत असतो. एकाद्या कार्यातील त्या व्यक्तीचें परिश्रमसातत्य या फुटकळपणांतून दिसत नाहीं. सर्व वाचून अवधान ठेवणाऱ्या वाचकालाच मागाहून संकलनरूपानें हे सातत्याचे भाग उमगतात.

कै. केळकर हे अशा एका काळीं कालवश झाले कीं तो एका पिढीचा आणि एका कालखंडाचा समारोप होता. केळकर, खाडिलकर, मुंजे, परमानंद, गांधी, जिना यांचे मृत्यू एका वर्षाचे आंत घडले. त्या कालखंडाला इंग्रजी राजवटीचा किंवा दोन महायुद्धांच्या आक्रमांनीं अंकित केलेला कालखंड म्हणता येईल. यांतील महाराष्ट्रीय नि मराठी भाषिक जीवनांत केळकरांच्या कर्तृत्वाचे, चारित्र्याचे आणि प्रवृत्तींचे, ठसे नि पडसाद उमटले. ते ऐतिहासिक महत्वाचेहि आहेत. त्या इतिहासाच्या साधनभूत ग्रंथामध्येंहि हा आठवणींचा ग्रंथ समाविष्ट होऊं शकेल.

**ग. वि. केतकर**

---

## साभार स्वीकार

### दिवाळी अंक

( १ ) अभिरुचि, ( २ ) सुषमा ( ३ ) प्रसाद ( ४ ) तरुण-भारत. नागपूर, ( ५ ) कुमार ( ६ ) हिंद ( ७ ) धनुर्धारी ( ८ ) मौज ( ९ ) काळ ( १० ) अर्थ (११) लोकयुग (१२) वनिताविश्व ( १३ ) नवभारत ( १४ ) साहित्य ( १५ ) लोकशाही ( १६ ) नवयुग ( १७ ) ज्ञान-प्रकाश ( १८ ) अखंडभारत ( १९ ) वाङ्मयशोभा ( २० ) महाराष्ट्र ( पुणें ) ( २१ ) महाराष्ट्र ( नागपूर ) ( २२ ) भवितव्य ( २३ ) किर्लोस्कर ( २४ ) चित्रमयजगत् ( २५ ) चिकित्सक ( २६ ) युगांतर ( २७ ) सह्याद्रि ( २८ ) प्रकाश, ( २९ ) लोकशक्ति ( ३० ) ध्रुव ( ३१ ) सत्यकथा ( ३२ ) चित्ररेखा ( ३३ ) समाधान ( ३४ ) जनवाणी ( ३५ ) समाचार ( ३६ ) भगिनी.

**दालू**— ( कादंबरी, किं. साडेतीन रु. ) ले०—वि. म. भुस्कुटे.

**अस्पृश्य**—( कादंबरी, किं. तीन रु. ) मूळ लेखक—मुलकराज आनंद.

**माक्सिम गोर्कीः**— माक्सिम गोर्कीच्या लघुकथा ( खंड १ ला ) एके काळीं माणसें असलेले प्राणी (खंड २) किं. १॥ रु. प्रत्येकी.

**मुलांचा लेनिन**—( आकार ११"× ८॥" ) मन निबर झालें की त्याला वळण लावतां येत नाही. जून वृक्षाप्रमाणे तें ताठ-रच राहतें. कोवळेपणा संस्कारक्षम असतो. हें जाणून बाळपणांत लेनिनच्या तत्त्वांची पेरणी केली म्हणजे थोरपणीं तीं तत्त्वें फैला-वतील अशा धोरणाने हें पुस्तक मराठींत अवतरलें आहे. लेनिनच्या प्रेरणेने शेतकरी-कामकरी-संघटना बळावून तिने रशियांत जी क्रान्ति घडवून आणली तिचा **चित्रपटच** आहे हें पुस्तक. ( किं. २ रु. )

हीं पुस्तकें स. ह. मोडक यांनी अनुवादिलीं आहेत. प्रकाशक—शकुंतला मोडक, ' लोक-साहित्य, ' ८७ शिवाजी पार्क, मुंबई २८

# मराठींतील स्वराघात : लें०— गो. कृ. मोडक, पुणें

## उत्तरार्ध

**प्रस्ताव**—यांप्रमाणें चतुर्विध आघातांच्या विचारानंतर लेखकाच्या म्हणण्याकडे वळूं.

कोणतेंहि प्रमेय ठरविण्यास अंतिम प्रमाण म्हणजे प्रत्यक्ष उदाहरणें होत. तेव्हा प्रस्तुत विषयाच्या चर्चेंत श्री. तगारे यांनी दिलेले उदाहरणभूत शब्द पारखणें उपयुक्त आहे. या उदाहरणांच्या घडणींत निभृत-अ याचें कार्य बरेंच दिसून येतें. तेव्हा या निभृत-अ-ची चर्चा येथे अगाऊ करणें उपयुक्त असल्याने तिकडे आपण वळूं.

**१८. भाषेचें अ-कार-विरोधी धोरण**—अ म्हणजे काय?—याची चर्चा पूर्वीं बरीच येऊन गेली आहे. तींत, उच्चारांतून वारंवार लोप पावल्याने अ-चा लपंडाव दिसून येतो. ही लपंडावाची प्रवृत्ति भाषेच्या अ-कारविरोधी धोरणाने उत्पन्न झाली आहे. हें भाषेचें धोरण यवनी भाषेच्या संसर्गाने आलें असावें. असंख्य यवनी शब्दांच्या पोटांत स्वरहीन व्यंजनें वारंवार ऐकूं येतात. ही लकब यवनांच्या संसर्गाने मराठी-भाषकांत शिरलेली दिसते. आदि-अक्षरांतील, आणि व्यंजनाने धरून ठेविलेला, हे दोनच अ-कार राखून, शेष सर्व अ-कार मराठी गाळून टाकिते. असें तिचें अ-कार-विरोधी धोरण आहे.

**एतज्जन्य अ-चा लपंडाव**—पुढील शब्दांत दिसून येईल. (१) कंस, कंसरें, कंसरेंत, कंसरेंती, यांपैकी शब्द १-मध्ये आदि अ-कार पुढील व्यंजनाची सोय करीत आहे. म्हणून अंत अ-कार पळाला. शब्द २-मध्ये मध्यगत अ-कार अन्त्य व्यंजनास साह्य करीत असल्याने, अंत अ गळला. ३-मध्ये त् आणि स् यांची सोय तत्तत्पूर्व अ-कारांबरोबर होत असल्याने, त्यांचे अ-कार लोपले. ४-मध्ये स्-चा अकार, स्-ला पूर्वस्वराच्या हवालीं करून, स्वतां भूमिगत झाला आहे. अ-चा व्यापार पुढील नामांच्या घडणींतहि दिसून येतो.

**१९. मराठींतील अ-कारान्त स्त्रीलिंगी नामें**—हा अ अथवा 'लपणारा अ-कार' कायमचा लोपत नाही. तो केवळ ( उच्चारणश्रवणरहित = ) बेकार होतो; आणि प्रकट होण्याच्या संधीची वाट पाहत असतो. अशी संधि मिळतांच तो प्रकट होतो. संस्कृतांतील आइ ई-एतदन्त स्त्रीलिंगी नामें तद्भवांत वारंवार अंतीं निभृत-अ घेऊन अ-कारान्त बनतात; जसें-माला, रीति, भगिनी हीं नामें मराठींत क्रमाने माळ, रीत, बहीण अशीं अ-कारान्त होतात. अ-च्या रूपाने राहिलेले हे यांचे अंत-स्वर, सामान्यरूप होतांना, फिरून आपापल्या मूळ रूपाने प्रकट होऊन क्रमाने, आ इ ई या स्वरांप्रमाणें वागतात; जसें-माळे(चे मणी), रीती(ने), बहिणी(ची माया),-यांतील सामान्यरूपान्तींचे स्वर भार्या, शक्ति, खोली यांच्या भार्ये, शक्ती, खोली या सामान्यरूपांतल्याप्रमाणें आहेत.

याप्रमाणें संस्कृतांतील अनेक आ-इ-ई-कारान्त नामें मराठींत अ-कारान्त बनतात. पद्धति, जाति, गति, दृष्टि, तरी, चुल्ली, पल्ली (प्राणिविशेष) यांचे तद्भव क्रमाने पद्धत, जात, गत, दृष्ट, तर, चूल, पाल असे होतात.

अे जसा शब्दाच्या अन्तीं तसा उपान्तींहि अन्य स्वराचे स्थानीं येतो.

**२०. उपान्त इ-उ>अ**—कोणत्याहि लिंगांतील उपान्तगत इ-उ-वर्णांचा वारंवार अे होतो. हे खालील शब्दांत दिसून येईल—

इ-वर्ण

पुं. (सं. अलक्तक>) अळिता>अळता, (प्रतिग्रह>) पडिघा>पडघा, काफिला>काफला.
स्त्री. (वकील>) वकिलात>वकलात, (मुतालीक>मुतालीकी>) मुतालिकी >मुतालकी, (कथील>) कथिली> कथली.
न.लिं.-भोंपिप>भोंपी, कणीस > कणशा ( =कणसें मळणारा).

उ-वर्ण

पुं. (अंगुष्ठक>) अंगुठा> अंगठा, (श्वशुरक>) सासुरा>सासरा,
स्त्री. बेडूकी>बेडकी, काबुली>काबली.
न. लिं. (सं. गुं-गुं-रुतकं>) घुंगुरुटें >घुंगुरटें.

या अंतोपांतांतील स्वर.लोपतो तो तत्पूर्व व्यंजनोच्चारास अवश्य नसल्यामुळें, हें सांगणें नकोच.

**शंका**—गत, सासरा, काफला, बेडकी इ.शब्दांत **जाड ठशांतील** अ उच्चारश्रवणांत येत नसल्याने तो तेथे आहे असें कां म्हणावें ? **उत्तर**—(१) या अक्षरांत कानाला अ-चा भास ( तो संदिग्ध का असेना ) होतो. (२) या व पुढल्या अक्षरांतील व्यंजनांचा ( जसें-बेडकी-मधील ड आणि क यांचा) संधि न होणें हें याच मधील भासमान अ-च्या अभावीं संभाव्य नाही.

**२१. क-प्रत्यय**—लेखकाच्या चर्चेंत क-प्रत्ययाचाहि संबंध वराच आला असल्याने त्याचीहि चर्चा येथें करणें योग्य आहे. चणक>चणअ>चणा. येथे चण शब्दास क हा प्रत्यय स्वार्थे ( म्हणजे असलेल्या विद्यमान अर्थात ) लागला आहे.

चण आणि चणक या दोहोंचा अर्थ एकच. तो म्हणजे हरभरा. यापासून चणा हा तद्भव बनला आहे. याच्या बनावांत कोणते वर्णविकार दिसतात ? **उत्तर**—(१) क्-या व्यंजनाचा लोप, आणि (२) मागे राहिलेल्या अ-चा पूर्वस्वराशी (दीर्घ) पूर्वरूप संधि. याच धर्तीवर आमलक, गोलक, शशक यांचे तद्भव क्रमाने आंवळा, गोळा, ससा असे होतात. मौक्तिक>मोत्तिअ>मोती या तद्भवांत क-पूर्व स्वर इ हा ई झाला आहे, तो याच्याच धर्तीवर होय.

**ज्ञातव्य**-दिवा-प्रमाणें अनेक आ-कारान्त पुं. शब्द आणि ए-कारान्त न.लिं. शब्दाहि क-प्रत्ययान्त संस्कृत शब्दांवरून आले आहेत.जसें-(१) **पुं.**-वंशक> वांसा, गलक >गळा, मूलक>मुळा. (२) **न. लिं.** भांडक>भांडें, स्वर्णक>सोनें, प्रवालक>पोवळें.

कांहीं स्त्रीलिंगी शब्द इका-प्रत्ययान्त आढळतात. जसा पुंलिंगांत क तसा स्त्रीलिंगांत हा इका प्रत्यय स्वार्थे आहे. शाटिका<साडिआ>साडी, वालुका>वाळुआ> वाळू.

( दीर्घ ) पूर्वरूप-संधीने दोन ऱ्हस्व अक्षरांच्या स्थानीं एक दीर्घ अक्षर आल्याने शब्दांतील अक्षरांच्या मात्रा टिकून आहेत. याने **मात्रासंधारण** साधिलें आहे.

दीपक>दीपअ>दीवअ>दीवा>दिवा,

या शब्दांत चणक–सदृश मात्रासंधारण साधून शिवाय दीपक-मधील क–चें पूर्वतर अक्षर दी वर्तमान तद्भवांत ऱ्हस्व झालें आहे.

हें दीवा–मधील ई–चें ऱ्हस्वत्व मराठी–भाषकांच्या **भेदरुचीमुळें** झालें आहे. अशा रीतीने येथें पुढील दोन नियम निघतात—

ज्ञातव्य–वरील तद्भवांतील श > स, म > वं, क्त > क, ट > ड, प > व इत्यादि वर्णविकार प्रस्तुतांत विवक्षित नसल्यानें, येथे चर्चिले नाहीत. अशीच अविवक्षितांची चर्चा पुढेहि वर्जिली आहे.

**२२. मात्रापालन व भेदरुचि–नियम**–क–प्रत्ययाचा क् लोपल्यावर, उर्वरित अ पूर्वस्वराशीं मिळून तो पूर्वस्वर दीर्घ होतो. ( अशा रीतीने या नियमाने शब्दांतील मात्रा कायम राहतात; म्हणजे **मात्रा--संधारण** साधतें. )

**नियम**–दोन दीर्घ अक्षरें लागोपाठ प्राप्त होत असल्यास, त्यांतील एक ( प्रायः पूर्वीचें ) ऱ्हस्व होतें. ( या नियमाचे मुळाशी भेद-रुचि हें तत्त्व आहे. )

यावरून दिसतें की, एकविध स्वराने युक्त अक्षरें उच्चारणें आपणांस रुचत नाही; व म्हणून त्यांतील एकाचा धर्म आपण बदलतों. हीच प्रवृत्ति पुढील शब्दांतहि दिसते. अतिशय अतीशय, लघुतम लघुत्तम ( साधारण भाष्य ),–या शब्दांत याच भेदरुचीमुळें सर्व लघु अक्षरांतील एक गुरु बनलें आहे. पहाट असा मूळ शब्द आहे. याचें सामान्य-रूप **पाहटे** असें होतें. यांत भेदरुचीमुळें शेवटाकडून गुरू, लघु, गुरू अशीं भिन्न धर्मांचीं अक्षरें आलीं आहेत.

ज्ञातव्य–मात्रासंधारण, भेदरुचि, याप्रमाणें अ--काराचा लपंडाव आणि मराठी शब्दाची दीर्घान्तोच्चार–प्रवृत्ति या गोष्टीहि तद्भवाच्या बनावांत आढळतात. (१) सं. भू–शिरस् > (२) भूशिर > (३) भूशिरि> (४) मूशीरें > (५) मुशीरें. येथे आपण पाहतों की, संस्कृतांतील अंत्य व्यंजन मराठींत तद्भवांत गळतें ( रूप २ ). मराठींत अन्त्य अ ( एकव्यंजनयुक्त ) निभृत होतो (३). यामुळे उच्चारतः इ–वर्ण अंतस्वर ठरतो; व दीर्घान्तोच्चारप्रवृत्तीमुळें शी दीर्घ होतो (४). भेदरुचीमुळें उपोपान्त ऱ्हस्व होतो (५). अशा कारणांनी मराठीच्या स्वभावानुसार मुशीर हें रूप बनलें असल्याने तें सर्वथा शुद्ध व प्रयोगार्ह ठरतें.

याप्रमाणें अ–चे खेळ आणि क–प्रत्ययाचीं कार्यें आपण पाहिलीं. यांच्या चर्चेत लेखकांनी उदाहरिलेले अनेकविध तद्भव शब्द आपण साधिले. या सर्वांच्या साधनिकेंत कोठेंहि स्वराघाताचा संबंध आला नाही. यामुळे उघड होतें की, संस्कृत शब्दापासून तद्भव बनतांना होणाऱ्या वर्णविकारांच्या मुळाशी स्वराघाताचा संबंध सामान्यतः दिसून येत नाहीं. हें आपलें मत लेखकाच्या मताशी सर्वस्वी विरुद्ध आहे. तेव्हा तत्त्वनिश्चयार्थ त्यांच्या या मताचा विचार येथें अवश्य कर्तव्य ठरतो.

**२३. लेखकदत्त स्वराघाताचे पुरावे**—पृ. २४मध्यें स्वराघाताच्या सिद्ध्यर्थ लेखक ६ पुरावे देतात. हे पुरावे असे--(१) स्वराघातामुळे ऱ्हस्वदीर्घांची **उलटापालट** होऊन **दीपक> दिवा.**(२) **साघात स्वर स्थिर** राहतो;निराघाताचा निभृत अ होतो.जसें–(साघात) **क्षीर>** खीर; (निराघात) भागिनी >बहीण. (३) स्वररूप असलेलें आदि अक्षर निराघात असल्यास लोपतें; जसें–अरघट्ट> रहाट, उपरि>वर. (४)आघाताने **व्यंजनाचें द्वित्व होतें,**

जसें-वानर > वान्नर. (५) तत्सम शब्दांत स्वराघात कायम राहतो. (६) अर्थभेदासाठीं स्वराघात आपलें स्थान बदलतो; जसें-(क) (हरभऱ्याची) डाळ, (हरभरे भाजून केलेलें डाळें>) डाळं. (ख) (सौंदर्य =) लावण्य-ची चतुर्थी लावण्यास; (रोप) लावणें-ची चतुर्थी लावण्यास. या सहा पुराव्यांचा क्रमशः विचार करूं.

**पुराव्यांचें परीक्षण** (१) दीपक > दिवा याची चर्चा येऊन गेली आहे. (२) भगिनी > बहीण हेंहि आपण सिद्ध केलें आहे. (३) 'आदि-स्वर लोपण्यास तो निराघात पाहिजे' ही लेखकोक्ति अव्याप्त व अतिव्याप्त असल्याने द्विधा-दुष्ट आहे;-अव्याप्त-अभ्यंतर> भीतर, अध्यवसाय> धिवसा- यांतील आदिस्वर साघात असूनहि गळतो. अतिव्याप्त-अहळीव, इतर व उपेक्षा,-यांतील आदि-स्वर निराघात असून गळत नाही. (४) वान्नर-यांतील द्वित्व केवळ यादृच्छिक आहे. त्याचे मुळाशी कोणतीहि शिष्टसंमत उच्चारप्रवृत्ति नाही. असेच यादृच्छिक विकार भाषेत अनेक आढळतात. त्यांस व्युत्पत्ति-शास्त्रांत कांहीच महत्त्व नाही. असे कांही विकार पुढील शब्दांत आढळतील—

अन्नातव > अन्नास्तव, कानिष्टेबल ( constable ) > गणेशटेबल, दुष्ट> दुष्ट, धूमपान> धूम्रपान, निद्रिंत > निद्रिस्त, पॅनोरमा ( panorama ) > मनोरमा, पिशाच > पिशाच्च, रिक्रूट > रंगरूट, लाजहोम > लज्जाहोम, सीमांतपूजन> श्रीमंतपूजन, हनिमून > हणमंत ( पॉइंट ).

**( ५ ) तत्सम शब्द कोणता ? उत्तर**—जो शब्द सर्वस्वी संस्कृत-तुल्य असतो. अर्थात् त्याचा आघातहि संस्कृतसमच असला पाहिजे. तेव्हां आघातसमत्व हें तत्स-माच्या अर्थामध्येच समाविष्ट असल्याने, 'तत्सम शब्दांत स्वराघात कायम असतो' हें सांगणें सर्वथा पुनरुक्त, अतएव निरर्थक आहे.

**२५. अर्थभेदासाठीं स्वराघात स्थानान्तर करितो( ? )**—एतत्सिद्ध्यर्थ (१) डाळे हें उदाहरण घेण्यांत आलें आहे;—असें दाखविण्यासाठीं की, हा शब्द डाळ असा आरंभीं साघात उच्चारिल्यास त्याचा अर्थ 'हरभऱ्याची डाळ' असा होतो; आणि डाळं असा उच्चारिल्यास, त्यापासून 'पंढरपूरचें डाळें' असा अर्थ निघतो. पण हें म्हणणें चूक आहे. कारण या दुसऱ्या अर्थांतहि पहिलेंच अक्षर साघात आहे; भेद आहे तो अन्त्य अक्षराच्या उच्चारांत. अर्थात् मुळांत स्थानभेदच नसल्याने या उदाहरणाने 'अर्थभेदार्थ स्थानभेद' सिद्ध होणें शक्य नाही. (२) (शकुंतलेच्या) लावण्यास (दुष्यंत भुलला)- यांत द्वितीय अक्षर साघात आहे, तर (त्याने झाड) लावण्यास (खाच सिद्ध केली) यांत प्रथमाक्षर साघात आहे. अशा रीतीने लावण्यास या शब्दाचे 'अर्थ भिन्न, आघाताक्षरहि भिन्न' हें पाहून कदाचित् कोणास वाटेल की, या उदाहरणानें प्रकृत विधान सिद्ध झालें. पण येथे पुढील गोष्ट विचारांत घ्यावी. प्रस्तुत शब्दांत आघात-स्थानाबरोबर व-चा उच्चा-रहि ( गुरु-लघु असा ) भिन्न-भिन्न आहे. सौंदर्य या अर्थात व गुरु आहे, तर आरोपण या अर्थात व लघु आहे. तेव्हां अर्थभेदाचें मूळ केवळ आघातस्थानभेद हें सिद्ध होत नाही. हा स्थानभेद, मूळ ठरलाच तर, अंशतःच ठरेल. शिवाय जरी क्षणभर 'अर्थभेद पूर्णतः मूळ आहे' असें या उदाहरणांत मानिलें तरी, वाचकांनी ध्यानीं घ्यावें की, 'आघातस्थानभेद सर्वथा शब्दरूपाधीन असतो.' अर्थात् अर्थज्ञापनाचे संबंधांत स्थानभेद घडलाच तर, तो केवळ यादृच्छिक असणार, सहेतुक कधीहि नसणार. यामुळे

तो 'लावण्यास' या शब्दांतहि यादृच्छिक आहे. 'रजपूत स्त्रियांनी (जतुगृह >) जोहार केला.' या वाक्यांत जोहार म्हणजे अग्निप्रवेश. आणि विठ्या माहराने (जयहर>) जोहार केला. यात जोहार=प्रणाम. येथे दोनहि शब्द प्रभवतः व अर्थतः भिन्न असूनहि त्यांच्या उच्चारांत भाषा आघातस्थानाचा भेद करीत नाही. म्हणजे येथे अर्थभेद असून आघात-स्थान--भेद नाही. उलट--(नंदयति इति=) (१) नंदनें=मुलगा, (२) नंदॅनॅ=इंद्राचें उपवन. येथे व्युत्पत्ति एक व (आनंददायकत्व इतक्यापुरता) अर्थहि एक; असें असतां भाषा उच्चारांत आघातस्थानभेद करिते. 'मुलगा' या अर्थी प्रस्तुत शब्द **तद्भव** आहे; तर 'उपवन' या अर्थी तो **तत्सम** आहे; व तत्तदनुसार उच्चार व आघात-स्थान हीं ठरलीं आहेत. यावरून येथे अर्थभेद नसून आघातस्थानभेद आहे. अशा रीतीने 'अर्थभेदाबरोबर आघातस्थानभेद होतो' हें विधान अन्वयाने वा व्यतिरेकानेहि सिद्ध होत नाही.

**सारांश**—आघातस्थानभेद झाल्यास तो उच्चारभेदामुळेच होतो, अर्थभेदाबरोबर तो झालेला आढळल्यास, ती केवळ यदृच्छा होय, नियम नव्हे, हें उघड होतें. तेव्हां 'अर्थभेदार्थ आघातस्थानभेद' हें लेखकाचें विधान मूळ धरीत नाही.

**ज्ञातव्य**— (स्वर्गातील. उपवन=) नंदन-यांत आयत वा निभृत-अ नाही. असें कां ? **उत्तर**—मराठींत या शब्दाचा उच्चार संस्कृततुल्य होतो; आणि संस्कृतांत हे दोन अ--कार मुळीच नाहीत. तेव्हा अर्थात् ते या तत्सम शब्दांत प्राप्त होत नाहीत.

**डॉ. भांडारकरांचें मत**–दिवंगत डॉ. भांडारकर याचें प्रस्तुत विषयासंबंधीं म्हणणें विचार्थ म्हणून लेखकाने दिलें आहे. त्याचा आतां विचार करूं. हें म्हणणें पृ. २३-२४ वर आहे. यांत स्वराघातामुळे होणारीं चतुर्विध स्वरकार्यें दिलीं आहेत.

(१) स्वराघातयुक्त स्वर दीर्घ होतो; जसें मौक्तिक मोतीं.

(२) निराघात स्वर ऱ्हस्व होतो; जसें-दीपक > दिवा; पीठिका > पिढी.

(३) निराघात स्वराचा अ होतो; जसें-पद्धति > पद्धत; जाति > जात; (अंगुष्ठक >) अंगुठा> अंगठा.

(४) निराघात स्वर लोपतो; जसें–अरघट्ट > रहाट.

येथे दिलेल्या कार्यांचे उदाहरणभूत शब्द आपण पूर्वी सिद्ध केलेच आहेत. यांच्या सिद्धींत स्वराघाताचा संबंध मुळीच दिसून आला नाही.

तेव्हा आघाताचें वरील चतुर्विध वर्णन कितपत विचार्य आहे हें वाचकांनीच ठरवावें. त्यांचे साह्यासाठी या वर्णनांतील अनुस्यूत तत्त्वाची चर्चा येथें करीत आहें.

**२७. स्वरविकार व आघातस्थानभेद यांचे पौर्वापर्य**–'आघातस्थान बदलल्याने शब्दस्वरास विकार होतो' ही गोष्ट वरील चारहि स्वरकार्यांत लेखकमतानुसार स्पष्ट दिसते.

**पद्धति**–या संस्कृत शब्दापासून मराठी पद्धत आला आहे. यामुळे पद्धति हा **प्रभव** आणि पद्धत हा **तद्भव** ठरतो. हें व्युत्पादन कसें होतें.

**उत्तर**-त् हें व्यंजन, त्याचा स्वर इ गळाला तरी, पूर्वस्वराबरोबर उच्चारित होणें संभाव्य असल्यानेंच, अंत्य इ >अ, म्हणजे पद्धति > पद्धत. येथे मूलतः **पद्धति** या **संस्कृत** शब्दांत प साघात आहे; आणि, **पद्धति** हा शब्दाकार यथास्थित आहे तों-

पर्यंत प साघातच राहणार. त्याचा तद्भव बनतांना, इ > अ याने बदललेल्या रूपांत, सुटलेला उच्चाराचा तोल फिरून ठीक करण्यासाठीं आघात प–वरून द्ध–वर येतो. म्हणजे सं. पद्धति > म. पद्धत. अशा रीतीने इ–चा अ झाल्याने आघात स्थानांतर करितो. येथे असें म्हणता येईल काय की, 'पद्धति–मधील आघात कारणावांचूनच प–वरून द्ध–वर गेला व या नव्या आघातास वागवितां येईल असा शब्दाकार साधण्याकरितां अन्त्य इ–चा अ झाला?' हें म्हणणें विपरीत असल्याने पहिलीच उपपत्ति ग्राह्य. ती म्हणजे मराठीच्या उच्चारप्रवृत्तीनुसार पद्धति–च्या इ–चा अ झाल्याने, शब्दरूपांतील बदलामुळे सुटलेला उच्चाराचा तोल सावरण्याकरितां आघात प–वरून द्ध–वर येतो.

अशा रीतीने 'स्वरविक्रियेमुळे आघातस्थानावर परिणाम होतो' हें स्पष्ट ठरतें. यामुळे वरील चतुर्विध स्वरविकारांची लावूं पाहिलेली आघातस्थानमूलक संगति विपरीत व म्हणून प्रामादिक ठरते. यावरून लेखकाने दिलेले ६ पुरावे आणि उदाहरिलेलीं ४ वर्णकार्यें (पृ. २३) 'स्वराघातामुळे स्वरप्रक्रियेंत महत्त्वाचे बदल होतात' या विधानाचें मुळींच समर्थन करीत नाहीत. मग लेखकाकडून असा व्यर्थ प्रयत्न कां व्हावा? याचें कारण **स्वराघाताविषयीं अयथार्थ कल्पना** हेंच दिसतें. यथार्थ कल्पना आल्यास कोणीहि वरीलप्रमाणें अर्थाने विपरीत प्रयत्न करणार नाही. तेव्हा ही कल्पना कोणती, हें सांगणें ओघानेच प्राप्त होतें.

२८. **स्वराघाताचें स्वरूप व प्रयोजन**—शब्द उच्चारतांना आपण विशिष्ट अक्षरें (संयोगाचा विचार येथें सोडून देऊं) किंचित् बळानें ठासून उच्चारितों. अशा बळाने, म्हणजे ताण किंवा दाब देऊन, विशिष्ट अक्षर उच्चारल्याने, शब्दोच्चार आपल्या जिभेस व कानास रुचतो व अर्थात् समतोल वाटतो.

पुढारी, पहिली, आचार्य, खुळा, वेळ, बोभाटा, ठिसूळ, वलुतें इत्यादि शब्दांत जाड ठशाचीं अक्षरें आपण ताण वा दाब देऊन उच्चारितों व असें केल्याने शब्दोच्चार आपणांस योग्य वाटतो.

यावरून उघड होतें कीं, 'शब्दोच्चार समतोल करणें' एतदर्थं स्वराघात प्रवृत्त होतो. कमळ, विहीर, कणीस, लाकूड या शब्दांचीं अनेकवचनें क्रमानें कमळें, विहिरी, कणिसें, लाकडें अशीं आपण करितों. येथें रूपभेदाबरोबर स्वराघाताचा स्थानभेदहि झाला आहे, ही गोष्ट येथील जाड ठशाच्या साघात अक्षरावरून दिसून येईल. यावरून रूपांत भेद झाल्यामुळे शब्दोचाराचा तोल सुटूं पाहत असल्यास, जरूर तर स्थानभेद करून, तो सांवरणें हेहि स्वराघाताचें कार्य ठरतें. म्हणजे थोडक्यांत, 'शब्दोच्चार समतोल करणें व राखणें' हें स्वराघाताचें दुहेरी प्रयोजन आहे.

शब्दस्योच्चार्यमानस्य समतोलत्वसाधनम् ।
भ्रष्टस्य प्रतिसंधानं द्विधाऽऽघातप्रयोजनम् ॥

वरील तत्त्व दृढ करण्यासाठी काही उदाहरणें घेऊं.

**ज्ञातव्य**—वर्णविकार व स्वराघातभेद हे जसे प्रभवापासून तद्भवाच्या व्युत्पादनांत, तसेच मुळापासून साधिताच्या साधनिकेंतहि आढळतात. तेव्हा प्रस्तुतांत तद्भवाच्या तुल्य महत्त्वाचे म्हणून कांही साधित शब्द येथें साधिले आहेत. त्यांवरून प्रकृत प्रयोगाचें समर्थन होईल.

२९. रूपांतील बदलामुळे आघातस्थानांत बदल—

| शब्द प्रत्यय | | | सदृश साधित |
|---|---|---|---|
| १ माप + आरी | = | मापारी. | ओतारी |
| २ पुंड + आवा | = | पुंडावा. | ओलावा |
| ३ बक्षीस + ई | = | बक्षिशी | |
| ४ मजूर + ई | = | मजुरी >मजेरी,लाकूड>लाकुडी>लाकडी, ढेकूण >ढेकणी, भोरीप>भोरपी. | |

५ मुतालीक + ई>मुतालाकी> मुतालिकी >मुतालकी
६ राग + ईट >रागीट
७ फूट + ईर > फुटीरे ————————————( फुगीरे )
८ कोर + ईव > कोरीवे ( बांधीवे, घडीवे )
९ तीळ + एल > तिळेल
१० भूक + एला > भुकेला
११ घर + ओवा > घरोवा ( वाघोवा )
१२ पाटील + की > पाटीलकी > पाटिलकी
१३ पान + गी > पानगी ( पोटगी )
१४ ऊव + ट > उवटे ( घामटे )
१५ दिवा + ली > दिवली ( सूप>सूपली>सुपली )

ज्ञातव्य —शब्द १२–मध्ये टी ऱ्हस्व झाला आहे, तर ५–मध्ये ता कायम राहिला आहे. असा भेद कां? उत्तर—इ- उ हे स्वर यथापेक्ष लांब–आखूड होतात, म्हणजे ते लवचीक अथवा नाम्य आहेत; तर आ नित्य–दीर्घ असल्यानें ताठर म्हणजे अनाम्य आहे. यामुळें अ–पूर्वी ई स्वर ऱ्हस्व झाला आहे, तर आ दीर्घच राहिला आहे.

वरील कोष्टकांत शब्दाला प्रत्यय लागल्याने बदललेल्या त्याच्या रूपांत उच्चाराचा सुटलेला तोल संभाळण्यासाठी स्वराघाताने आपलें स्थान प्रायः बदललेलें आढळून येतें. यावरून उघड होतें की, स्वराघात शब्दरूप बदलण्यास कारण नसून शब्दांतील रूपाच्या बदलाचें तो कार्य आहे.आघातानें रूप बदलत नसून रूपानेच आघात बदलतो.प्रथम शब्दाचें रूप विविध कारणांनी बदलतें व नंतर उच्चाराचा तोल सांवरण्यासाठी स्वराघात उद्युक्त होतो. अर्थात् स्वराघात हे शब्दांत होणाऱ्या सर्व वर्णविकारानंतर घडणारें केवळ उच्चार-विषयक कार्य आहे. अशा स्थितींत ( पृ. २३ च्या मुळाशीं विचार्य म्हणून ) लेखकांनी उदाहरिलेल्या पुढील विधानाने सखेद आश्चर्य वाटतें.

३०. लेखकांनी उदाहरिलेला प्रधान सिद्धान्त—स्वराघाताच्या नियमांनी स्वरप्रक्रियेंत महत्त्वाचे बदल झाले आहेत. शब्दांतील उपान्त अक्षरावर आघात आल्या-मुळे अंत्यस्वराचा लोप झाला; जसें—पद्धति>पद्धत इ. या सिद्धांतांतील आघातस्थानां-तर व स्वरलोप यांचा विचार करूं.

३१. समकालीन घटनांचा कार्यकारणभाव—वरील सिद्धान्तानुसार (संस्कृत) पद्धति>( मराठी ) पद्धत.

या व्युत्पत्तींत संस्कृत शब्दांतील आघात प-ला सोडून द्ध-वर आला आहे; आणि अन्त्य इ-चा अॆ झाला आहे. आघाताचें स्थानांतर आणि अन्त्य स्वरलोप हीं दोनहि कार्यें समकालीन आहेत.

यांत कार्यकारणभाव असल्यास, कारणभूत वस्तु प्रथमोत्पन्न असून स्वतंत्र असली पाहिजे. या दृष्टीनें आघातस्थानभेद कारण असल्यास तो प्रथमोत्पन्न व स्वरलोपानपेक्ष असला पाहिजे. पण इ-च्या निभृतत्वानंतर त्याचा परिणाम म्हणून, आघातस्थानभेद उत्पन्न होतो. करितां तो प्रथमोत्पन्न नाहीं व परानपेक्षहि नाहीं; व यामुळें स्वरलोपाचें कारण होऊं शकत नाही. याचे उलट-इ > अॆ हें वर्णान्तर प्रथमोत्पन्न असून स्वतंत्र असल्याने कारण होण्यास पात्र आहे. यावरून ठरतें की, इ > अॆ हें कारण आणि आघातस्थानभेद हें कार्य आहे. तात्पर्य, अंत्य अ-कार लोपल्याने बदललेल्या पद्धति या शब्दाच्या रूपांत, ढळलेला उच्चार-तोल सावरण्यासाठीं, आघात प्रथमाक्षरावरून मध्यमावर आला. अशा रीतीने प्रथम स्वरलोप व नंतर आघाताचें स्थानांतर हें पौर्वापर्य किंवा कारणकार्यभाव कोणासहि पटेल.

**अॆ आणि अॅ यांचें व्यवहारमूल्य**— याप्रमाणें आपण स्वराघाताची चर्चा केली; आणि पाहिलें कीं, **स्वराघात** हा रूपविकारानंतर होणारा **उच्चारविकार** आहे. अर्थात् त्याच्यापासून उलट शब्दरूपांत कांहीच बदल होणें शक्य नाही. मग या चर्चेचा उपयोग काय? उपयोग व्यवहारतः नसला तरी तत्त्वतः आहे, एवढें मान्य केलें पाहिजे. व्यवहारांतसुद्धा या चर्चेच्या अनुषंगाने पुढील प्रकारें आपणांस लाभ करून घेतां येईल— तुला कसें वाटतें ? —हें वाक्य अलीकडे वारंवार '(तुला) **कस वाटत !**' असें उच्चारानुसारी म्हणून लिहिलें जातें. यांत शब्दान्तीं अॅ स्पष्ट ऐकूं येतो. तेव्हा आपला शब्दोच्चार वाचकांस निश्चित कळावा अशी इच्छा असल्यास, प्रस्तुत वाक्य '(तुला) कसॅ वाटतॅ ?' असें लिहावें; म्हणजे वाचकाचा घोटाळा होणार नाहीं. याचप्रमाणें निभृत-अ—चेंहि लेखन अॆ या खुणेनें केल्यास वाचकांची सोय होईल. 'या सोन्याचा कसॆ कायॆ लागॆला ?'— हें वाक्य यथादर्शित लिहिल्यास वाचकाकडून त्यांचें वाचन निश्चयानें लेखकाच्या अपेक्षेनुसार होईल.

**सारांश**—मराठीच्या प्रस्तुत लेखनांत अ-या एकाच आकारानें ३।४ भिन्न उच्चार आपणांस दर्शवावे लागतात. यामुळें, 'मराठी ज्याची जन्मभाषा नाही,' त्याच्या वाचनांत घोटाळा होण्याचा संभव आहे. हा संभव वरती सुचविलेल्या (अॆ आणि अॅ याच्या) चिन्हांनी नाहींसा करितां येईल. हल्ली आपण चक्रधर-सारख्या या शब्दांतील चारहि अ-कार सारखेच दर्शवितों. त्यांतील संस्कृतांत नसलेले दोन अ-कार पुढीलप्रमाणें दर्शविल्यास कोणीहि वाचक त्यांचें वाचन शुद्ध करूं शकेल.

**उदाहरणार्थ**—चक्रधर-चें लेखन चक्रधॅरॆ असें करावें. आपल्या बोलण्यांत अॆ पदोपदीं येतो. लेखनांत एतदर्थ कांहीच आकारभेद न केल्यास लेखकाचा अर्थ वाचकास कळण्यास वारंवार अडचण संभवेल किंवा त्याचे मनांत भलताच अर्थ येईल. पुढील शब्दांत अॆ-च्या उच्चारणांत पुष्कळ लोक चुकतात,—गदगाफरी, तबकडी, पळसदरी, संगमरवरी, हडपसर, कुचकामी, सरबराई. तेव्हा हे शब्द शुद्ध उच्चारिले जाण्यासाठीं त्यांत अॆ-चें लेखन पुढील प्रमाणें यथास्थान करावें-गदॆगाफरी, तबकॆडी, पळसॆदरी, संगमरवॆरी, हडपॆसरॆ, कुचॆकामी, सरबरॊई.

**निगमन**—याप्रमाणें आपण या लेखांत स्वराघाताचे ४ प्रकार पाहिले. सर्व, वरील, फरारी या शब्दांत क्रमाने उच्चारांत येणारे खटका, ताण आणि दाब हे आपण लक्षांत

घेतले. यामुळेंच आघातांतील भेद लक्षांत देतात. जोडाक्षरांत दोन प्रकार आपण पाहिले. ‘फक्त’ आणि ‘ऐकतांना’ यांत पूर्वशब्दांत क-त यांचा संयोग आहे, तर उत्तरशब्दांत केवळ त्यांचें परस्परसान्निध्य आहे. येथील या दोन व्यंजनजोडयांस आपण क्रमानें संयोग आणि योग म्हटलें आहे. अर्ढळे-सारख्या शब्दांत (क) ढ-मधील अ लांबट (=आयामानें युक्त, अर्थात् सायाम) उच्चारिला गेल्याने त्यास आपण आयत-अ आणि (ख) ळ-मधील अ प्रायः अश्रुत असल्याने त्यांस आपण निभृत-अ म्हटलें आहे. याप्रमाणें अ-च्या नंतर अे अवश्य असतोच. जोडाक्षर किंवा अश्रुत अ-कार याच्या अभावींहि पुरावा, तराजू, बटाटे पहिला, नमुना इत्यादि शब्दांत जाड टशाचीं अक्षरें साघात ऐकूं येतात. उच्चारांत या अक्षरांवर भर दिला जातो. अशा अक्षरांवरील आघातास आपण भरात्मक आघात म्हटलें आहे. तर पूर्वोक्त आघातांस क्रमानें संयोगपूर्व, योगपूर्व, व सायाम असें म्हटलें आहे. स्वराघाताची पाहणी करताना अक्षरसंख्येनुसार आपण द्व्यक्षरी व त्र्यक्षरी शब्द अशा दोन गटांचें परीक्षण केलें. या परीक्षणास उपयुक्त म्हणून भाषेतील स्वरांची पाहणी केली. तींत आपणांस १५ स्वर मानावे लागले. यांत अ आणि अे हे दोन याच कामासाठी आपण नवीन गणिले. हे स्वर भाषेंत नेहमीच आहेत. पण ते स्वतंत्र ओळखण्यांत येत नाहीत. येथें आपल्या कामासाठी ते स्वतंत्र घेऊन त्यांना संज्ञा दिल्या आहेत. या १५ स्वरांच्या साह्यानें शब्दाच्या घटनेंत आदि-मध्यान्तीं कोणकोणते स्वर येऊं शकतात, हें पाहिलें; आणि या माहितीच्या अनुरोधाने द्व्यक्षरी व त्र्यक्षरी शब्दांतील भरात्मक आघातांचीं स्थानें ठरविलीं. या चतुर्विध आघातांचें बलाबलहि आपण पाहिलें. त्यांत भरात्मक आघात हा सर्वांत बलिष्ठ दिसून आला. याप्रमाणें आघाताविषयीं आपण चर्चा केली.

नंतर या चर्चेंत विशेष महत्त्वाच्या म्हणून पुढील दोन गोष्टींचा विचार केला. त्या गोष्टी म्हणजे (१) भाषेची अ-कार गाळण्याची प्रवृत्ति आणि (२) क-प्रत्ययान्त संस्कृत शब्दांचे तद्भव बनवितांना पूर्व व पूर्वतर स्वर यांना होणारे विकार. याच व्युत्पादनांत इ उ या स्वरांच्या ठिकाणीं, अंतीं वा उपांन्तीं, अे वारंवार आढळतो, हें आपण पाहिलें. प्रभवाच्या मात्रा कायम ठेवण्याकडे, त्याचप्रमाणें एकविध अक्षरें, त्यांतील एकाचा धर्म बदलून, कानास कंटाळवाणीं होऊं न देण्यासाठीं मराठी भाषा कशी खटपट करिते, हेंहि पाहिलें.

इतकी पूर्वसिद्धता झाल्यावर स्वराघातसिद्ध्यर्थ लेखकांनी दिलेले ६ पुरावे व ४ वर्ण-कार्यें यांचें परीक्षण केलें. त्यांत लेखकाची विचारसरणी प्रायः प्रामादिक आहे, असें आपणांस दिसून आलें. ‘अगोदर स्वराघात, नंतर स्वरविकार’ हें लेखकस्वीकृत तत्त्व कसें विपरीत आहे, वास्तवाच्या सर्वस्वीं विरुद्ध आहे, हें आपण अनेक तद्भव व साधित शब्द यांच्या साह्यानें सिद्ध केलें. तसेंच बोलणाराचा अर्थासंबंधीं घोटाळा होऊं नये म्हणून ‘स्वराघात एकाच आकाराच्या शब्दांत आपलें स्थान बदलतो’ अशा प्रकारची लेखकांनी आघातास दिलेली भलाइकी कशी अस्थानीं आहे, हेंहि दर्शविलें. लेखकांचे विचार जरी अशा रीतीने सदोष दिसून आले, तरी ते विशेष दोषास पात्र नाहीत. कारण, हा विषयच मराठींत प्रायः नवीन असल्याने, हे विचार पुरोगामी आहेत. अर्थात् ते प्रामादिक असणें अगदीं साहजिक आहे.

असो. प्रस्तुत विषयावर वाचकांपुढे माझे विचार मांडण्याची संधि श्री. तगारे यांच्या लेखाने मला मिळाली, याबद्दल त्यांचे आभार मानून हा लेख संपवितों.

---

अनुक्रमणिका

# संपादकीय

## शोकसमाचार

**(१) नाटककार माधवराव जोशी**—गेल्या अंकीं नाट्याचार्य खाडिलकरांच्या निधनाची दुःखदायक नोंद करावी लागली. नाट्याचार्यांच्या पाठोपाठ दुसऱ्या एका थोर नाटककाराची निधनवार्ता देण्याचा प्रसंग यावा हें दुर्दैव होय. दोघां नाटककारांच्या गुणा-वगुणांची तुलना इथे अप्रस्तुत असली आणि दोघांचेहि पंथ निरनिराळे असले तरी दोघां-नींहि आपल्या गुणांनी मराठी रंगभूमीचा उत्कर्ष करण्यांत सारखेंच यश मिळविलें आहे असे म्हणण्यास हरकत नाही. किंबहुना माधवरावांचें धारिष्ट वाखाणण्यासारखें आहे. श्री. खाडिलकरांच्या जहाल लेखणीचा रोख नोकरशाहीवर विशेष होता. आणि नोकरशाहीचा रोष ओढवून घेण्यासहि धैर्य लागतें. पण त्या रोषांत एक प्रकारें भूषण आहे. जनदृष्टीने तो रोष गौरवास्पदच होता. पण माधवरावांनी दाखविलेल्या धारिष्टांत जनतेच्या रोषाची धास्ती होती आणि ती ओढवून घेण्यांत पडद्याआड जाण्याचा धोका होता. पण ते डरले नाहीत. वाङ्मय म्हणजे समाजजीवनावरचें भाष्य होय. माधवराव जोशी यांचें भाष्य वर्मी घाव घालणारें होतें. पण विशिष्ट व्यक्तीपेक्षा त्या विशिष्ट वर्गाचा मर्मभेद करण्याकडे त्यांच्या लेखणीचा रोष होता. व तें भाष्य विनोद उपहास यांनी शृंगारलेलें व समाजांतील अगदी खालच्या थरांतील जनतेची वकीली पतकरून केलेलें असल्यामुळे जनतेने त्यांच्या परिश्रमाची वूज केली. लोकप्रियतेंत त्यांच्या म्युनिसिपालिटीने उच्चांक गांठला होता. नाट्य संमेलनाचें अध्यक्षपद त्यांनी भूषविलें होतें आणि त्या भाषणांतील विचारांनी त्यांनी त्या गौरवांतील पात्रता पटविली होती. असा निर्भीड नाटककार ता. १६ ऑक्टोबर रोजीं दिवंगत झाला, हें दुर्दैव होय.

× × ×

**( २ ) दत्तो अप्पाजी तुळजापूरकर**—माधवराव जोशी यांच्या मागोमाग काळाने श्री. तुळजापूरकरांना आमच्यांतून नेलें (ता.८-१२-४८). अनुभवी व मुरब्बी व्यक्तींचा वियोग विशेष जाणवतो. मुंबई मराठी साहित्य संघाच्या संस्थापनेपासून श्री. तुळजापूरकरांचा आधार संघास मिळत गेला होता. आमच्या म. सा. परिषदेच्या प्रपंचांतहि त्यांनीं मनोभावें मदत केली होती. परिषदेचे उपाध्यक्ष म्हणून त्यांनी केलेली सेवा परिषदेच्या इतिहासांत नमूद आहे (इ.स.१९३७-३९). परिषदेच्या सध्यांच्या घटनेस त्यांच्या सल्ला-मसलतीचा हातभार पुष्कळच लागला आहे.

साहित्यिक म्हणूनहि मराठी वाचकवर्ग त्यांना विसरणार नाही. कै. अच्युतराव कोल्हटकरांच्या वृत्तपत्रीय जीवितांत तुळजापूरकरांचें साहाय्य बरेंच झालें आहे. त्या काळीं गाजलेली वत्सलावहिनींचीं पत्रें श्री. तुळजापूरकरांच्या लेखणीची लीला होय. माझें रामायण ही कांहीशी आत्मचरित्रपर कादंबरी वाचल्यास जसा त्यांच्या जीवनावर व विचारावर तसाच त्या काळावरहि चांगला प्रकाश पाडते.

× × ×

( ३ ) के. वा. गजेंद्रगडकर—सुप्रतिष्टितांच्या पंगतींत भगदाडें पाडण्याची काळाची करणी किती निष्ठुर आहे ह्याची प्रचीति सातान्याचे के. वा. गजेंद्रगडकर ह्यांच्या आकस्मिक निधनाने आणखी एकदां आली. नोव्हेंबरच्या अखेरीस म. सा. परिषदेच्या नियामक मंडळाच्या सभेस श्री. गजेंद्रगडकर आले होते. ती त्यांची अखेरची गांठ भेट होय अशी कुणास कल्पना आली असेल ? पण गतवर्षी त्यांचे बंधू प्रि. अ. बा. गजेंद्रगडकर यांच्या निधनाची वार्ता जशी अकस्मात आदळली तशीच परवा ता. ११-१२-४८ रोजीं त्यांच्या ह्या बंधूंच्या आकस्मिक निधनाची वार्ता ऐकण्याची शोचनीय पाळी आली. वयाने व कर्तेपणाने ' झालेल्या ' व्यक्तींचे निधन नैसर्गिक म्हणून मनाची थोडीबहुत समजूत तरी घालतां येते. पण धडधाकट, चालती-बोलती व्यक्ति हारपल्याची वार्ता ऐकायला मन तयारच नसतें !

के. बा. गजेंद्रगडकर हे व्यासंगी व सत्प्रवृत्त गृहस्थ होते. कायद्यासंबंधीं त्यांनी सतत लेखन करून जनतेला मार्गदर्शन केलें आहे. परिषदेच्या कामांत ते आस्थेने भाग घेत आणि त्यांत मानाची बिलकूल हाव त्यांना नसे.

× × ×

( ४ ) भास्कर बळवंत भोपटकर

दुजा, बिजा, तिजा ! शोकसमाचाराची ही कटु कामगिरी एवढ्यावरच भागली, अशा कल्पनेने लेखणी दूर सारायची तोंच भास्कर बळवंत भोपटकर हे ( ता. २७-१२-४८ रोजीं ) कालवश झाल्याचें वृत्त आलें. लोकमान्यांच्या स्वराज्याच्या लढ्यांत हिरीरीने भाग घेणारे ( तात्यासाहेब केळकर, काकासाहेब खाडिलकर यांसारखे ) एक एक सेनानी कालवश होत आहेत हें पाहून कोणालाहि वाईट वाटल्याशिवाय राहणार नाही. लोकमान्यांच्या पश्चात् भारतीय स्वातंत्र्याच्या लढ्याला महात्माजींच्या तत्वज्ञानाने जें वळण लागलें तें श्री. भोपटकरांना पसंत नव्हतें. ही नापसंती बोलून दाखविणें मोठेंच धारिष्टाचें होतें. महात्माजींच्या कार्यपद्धतींतलि दोष दाखविणें म्हणजे देशद्रोही ठरणें, असाच जड अनुयायांनी अर्थ केला. पण भास्कर बळवंत आपल्या मताच्या अभिव्यक्तींत कचरले नाहीत. एकादी विचारप्रणाली पटली नाही म्हणून देशभक्त लगेच देशद्रोही कसा ठरेल ?

श्री. भा. ब. भोपटकरांच्या ठिकाणीं मराठ्यांचें कडवेपण पुरेपूर होतें. त्यांना भालाकार भोपटकर म्हणूनच लोक ओळखत; पण अलीकडच्या वाचकवर्गाला त्या भाल्याचें पाणी कसें प्रखर होतें ह्याची कल्पना नाही. ' भाल्याच्या फेकी ' ह्या नांवाचे त्या पत्रांतील अग्रलेखाचे दोन भागहि आता अप्राप्य आहेत. ते ज्यांनी वाचले असतील त्यांना त्यांच्या जहालपणाची महती ठाऊक असेल. अलीकडे तो जहालपणा त्यांच्या भाषणांतूनच गांधीवादी जनांवर टीका करतांना व्यक्त होत असे. त्या टीकेच्या भरांत नवनवीन शब्द बनविण्याची जी हातोटी प्रगट होत असे तीहि वाखाणण्यासारखी असे. गांधाळ, मागी ( मागावरील कापड वापरणारे ), बोलूकाका, मठ्ठ पण घट्ट अनुयायी वगैरे शब्दांतील अर्थगर्भता आणि मराठी भाषेची प्रकृति कोणालाहि पटण्यासारखी आहे. लोकमान्यांच्या पिढींतील एक बेडर देशभक्त हरपल्याचा महाराष्ट्राला शोक वाटावा हें उचितच होय.

---

अनुक्रमणिका

# नवीन सभासद

कै. चिपळूणकर स्मारकासाठी देणगी दिल्यामुळे झालेले

## हितचिंतक

( १ ) श्री. माधव श्रीहरी अणे, रांची ( बिहार )

## तहहयात

( १ ) श्री. सदाशिव मार्तंड पाटणकर, ४७८।८ टिळक रस्ता, जानकी भुवन, पुणें २
( २ ) कॅ. गजानन भिकाजी भिडे, ओ. सी. २६८ इन्. त्रि. सि. सेक्शन ५६ आर्मी पोष्ट ऑफिस, न्यू दिल्ली.
( ३ ) कॅ. वसंत माधव भिडे, १९६।४० सदाशिव, पुणें २
( ४ ) सौ. उमाबाई सहस्रबुद्धे, ५८७।८ शुक्रवार, टिळक रस्ता, पुणें २.
( ५ ) श्री. गणेशशास्त्री जोशी वैद्य, २८ शुक्रवार, पुणें २
( ६ ) श्री. सदाशिव काशिनाथ गोखले, ४९७ शनवार पेठ, पुणें २

## साधारणचे तहहयात झालेले सभासद

( १ ) श्री. अ. ह. लिमये, व्हीनस बुकस्टॉल, आप्पाबळवंत चौक, पुणें २
( २ ) श्री. सदाशिव गोविंद बर्वे, नं १ क्वीन्स गार्डन पुणें १
( ३ ) श्री. नारायण गणेश नारळकर, वेस्टर्न इं. विमा कंपनी, मुंबई १
( ४ ) प्रि. कृष्णाजी महादेव खाडये, ३६६।५ नारायण, पुणें २

## साधारण सभासद

( १ ) श्री. कृष्णाजी लक्ष्मण गोखले, गोखले बिल्डिंग, टिळक रस्ता पुणें २
( २ ) श्री. हरी विनायक तेंडुलकर, ३५२ । २ सदाशिव, पुणें २
( ३ ) श्री. भीमराव रामचंद्र पाटील, विद्यामंदिर, इस्लामपूर ( सातारा )
( ४ ) प्रा. मधुकर वासुदेव घोंड, छब्बींचा बंगला, स्टेशनरोड, धारवाड.
( ५ ) श्री. नारायण अनंत नाईक, वल्लभदास तेजपाल वाडी, घाटकोपर ( जी. आय्. पी. )
( ६ ) विश्वनाथ त्र्यंबक शेटे. वकील, १८७ शनिवार, पुणें २
( ७ ) श्री. मुरलीधर गजानन पानसे, ५४५ नारायण, पुणें २
( ८ ) श्री. प्रभाकर चिंतामण देशपांडे, आशाकुंज, मु. पो. भडगांव ( पू. खा. )
( ९ ) प्रा. मल्हार गणेश देसाई, खेरांचा बंगला, मराठा कॉलनी, धारवाड.
( १० ) श्री. मनोहर सावळाराम नाईक, ३५२ नारायण, पुणें २
( ११ ) श्री. पुरुषोत्तम श्रीपती पाटील, वैदिकाश्रम, खोली क्र. २३, पुणें ४.
( १२ ) श्री. जगदेव महादेव गुनापुरे. भंडारकवठें, पोष्ट- मंद्रूप, (जि). सोलापूर.
( १३ ) प्रा. राजाराम रामचंद्र मालेगांवकर. ४५३ सदाशिव, पुणें २
( १४ ) श्री. घनश्याम गरबड नारखेडे, प्रायमरी ट्रे. कॉ. फॉर मेन, जळगांव ( पू. खा. )
( १५ ) श्री. गोविंद भोजू वाघुळदे, १९६ भवानी पेठ, जळगांव (पू. खा.)
( १६ ) श्री. रामकृष्ण वालजी पाटील, २३१ भवानी पेठ, जळगांव. (पू. खा.)
( १७ ) सौ. वसुंधरा पटवर्धन, १८९ शुक्रवार, पुणें २
( १८ ) श्री. शंकर गंगाधर कुलकर्णी, २१० शुक्रवार पेठ, पुणें २

अनुक्रमणिका



मुद्रक— लक्ष्मण नारायण चापेकर, 'आर्यसंस्कृति मुद्रणालय,'
१९८/१७ सदाशिव पेठ, टिळक रस्ता, पुणें २.

प्रकाशकः— रामचंद्र श्रीपाद जोग, महाराष्ट्र-साहित्य-परिषद्, टिळक रस्ता, पुणें २.






अनुक्रमणिका

